

**RAMACHANDRA RAO KAVALGIKAR,** B. A., LL. B.
Diploma in Physical Education,
Diploma in Education of the Blind,
Diploma in Physio-therapy,
U. N. and U. S. A. Certified Fellow in the Education
and Rehabilitation of the Blind and the Deaf.
Principal, Government School for the Blind and the Deaf,
Hyderabad ( Deccan. )

# ही पहा अमेरिका

: लेखक :
रामचंद्रराव कवलगीकर,
बी. ए., एलएल. बी.,
युनायटेड नेशन्स् फेलो ( U. S. A. )

मूल्य दोन रुपये

# दोन शब्द

अमेरिकेंतील माझ्या अनुभवांचें द्योतक वर्णन 'ही पहा अमेरिका' या पुस्तक-रूपानें वाचकांपुढें येत आहे. याचीं कांहीं प्रकरणें हैद्राबादेंतील लोकप्रिय 'लोकविजय' साप्ताहिकांत प्रसिद्ध झालीं आहेत.

अमेरिकेंतील पंधरा राज्यांतील पंचवीस शहरांना मीं भेटी दिल्या. सुमारें पन्नास खेडीं पाहिलीं. मला आलेल्या नानाविध अनुभवांचें वर्णन अशा लहान पुस्तकांत करणें कठीण आहे.

प्रा. गणेशराव थत्ते यांनीं पुस्तक प्रसिद्ध करण्याची मूळ कल्पना दिल्याबद्दल, प्रा. मुरलीधरराव घाणेकर यांनीं उपयुक्त सूचना केल्याबद्दल व डॉ. नारायणराव नांदापुरकर यांनीं वरचेवर प्रोत्साहन दिल्याबद्दल मी या मित्रांचा अत्यंत आभारी आहे.

या पुस्तक-वाचनानें वाचकांच्या ज्ञानांत थोडीफार भर पडल्यास मला धन्यता वाटेल.

विजयादशमी,
२८ सप्टेंबर १९५२
७०८ सुलतान बझार
हैद्राबाद (द.)

रामचंद्रराव कवलगीकर

# अनुक्रमणिका



# ही पहा अमेरिका

## प्रकरण १ लें

विस्कटलेला आंतरराष्ट्रीय सलोखा, प्रेम आणि शान्तीचा परिपोष व्हावा व जगाची आर्थिक घडी नीट बसावी म्हणून निरनिराळ्या राष्ट्रांतील समाजसेवकांसाठीं संयुक्त राष्ट्रानें शिष्यवृत्त्या ठेविल्या आहेत. अंध, मूक व शरीरानें पंगू असलेल्या मुलांमुलींस कशा प्रकारचें शिक्षण दिलें जातें आणि अशा लोकांकडून अमेरिकेंत कसें विपुल प्रमाणांत अर्थोत्पादन केलें जातें याचा अभ्यास व निरीक्षण करण्याकरितां एक शिष्यवृत्ति जाहीर झाली. ही शिष्यवृत्ति आपल्याला मिळावी म्हणून मीं अर्ज केला. अर्जाचे छापलेले बारा फार्म पूर्णपणें भरून मीं पाठविले. हा अर्ज भारत सरकारनें संयुक्त राष्ट्राच्या निवड कमिटीकडे पाठविला. पांच महिने होऊन गेले, कांहींच कळेना, तेव्हां माझ्या परदेशांत जाणाऱ्या उत्कंठेस ओहोटी लागली आणि नेहमीप्रमाणें मीं माझी दैनंदिनी सुरू केली.

सुटीचा दिवस तो. दुपारीं यथेच्छ भोजन झालें होतें. पडल्यापडल्या वर्तमानपत्र चाळीत होतों मी. इतक्यांत तार...साहेब म्हणून पोस्टमन ओरडला...मेसर्स गोवन ब्रदर्स, ओव्हरसीज ट्रॅव्हल एजन्सी...दिल्ली... वाचून जरा चमकलों. पाकीट फोडलें. पांच पानें आंत. देवी, कॉलरा व टॉयफाईड वगैरेंवर प्रतिबंधक उपाय करून घेतल्याचा दाखला, इराक, इजिप्त, इराण, स्वित्झरलंड व इंग्लंड या देशांतून जाण्याचा परवाना... अमेरिकेंत प्रवेश करण्यास व्हिसा आणि सांताक्रुझ विमानतळावर अमक्या तारखेस हजर...वगैरे मजकूर वाचून थक्क झालों मी. या कामास मला फक्त दहा दिवसांची मुदत दिली होती.

उन्हाळ्याचे दिवस ते. लागोपाठ इन्जेक्शन्स घेतलीं. पोलिसांनी चांगल्या वर्तणुकीचा दाखला दिला. मद्रासला जाऊन पासपोर्ट आणला. या कामास १९ दिवस लागल्यामुळें माझें पहिलें विमान चुकलें. पुनः दहा दिवसांची मुदत मागून घेतली. कपडे करून घेण्यास व घरची व्यवस्था करण्यासहि मला वेळ मिळाला नाहीं. ताबडतोब मुंबईस जाऊन अमेरिकन कॉन्सलची भेट घेतली. याच मुदतींत लेकसक्सेसहून माझी फेलोशिप म्हणून निवड झाल्याचा खलिता संयुक्त राष्ट्रांनीं माझ्याकडे पाठविला. त्या खलित्यांत संयुक्त राष्ट्रांनीं अमेरिकेंतील माझ्या प्रवासाचा सर्व खर्च आणि माझ्या निर्वाहाकरितां दरमहा तीनशें डॉलरची शिष्यवृत्ति दिल्याचें लिहिलें होतें. मुंबईतील अमेरिकन कॉन्सलला हा खलिता दाखविला. तेथें दाही बोटांचीं व पूर्ण तळहाताचीं छायाचित्रें घेतलीं गेलीं. मृत्यु घडल्यास जवळचा वारस कोण व त्याचा पत्ता काय हें लिहून घेतलें. कॉन्सल म्हणाले, " अमेरिकेमध्यें आपला प्रवास सुखाचा होवो. आमचा देश समृद्ध असल्यामुळें तुम्हांस कांहीं कमी पडणार नाहीं. उलन सुटसू घ्या. तिकडे थंडी फार आहे. अंथरूणपांघरूण, तांब्याभांडें वगैरे कांहीं घेऊं नका. प्रवास फार सोपा आहे. सर्व ठिकाणीं तुमच्या संपूर्ण गरजा भागतील. " अमेरिकेबद्दल थोडीशी कां होईना माहिती मिळाल्यामुळें मला जरा बरें वाटलें. गुडलकचा त्यांचा आशीर्वाद घेऊन अमेरिकन एक्सप्रेस कंपनीमध्यें डॉलरच्या चौकशीकरितां मी गेलों. दुसऱ्या दिवशींच विमान निघणार होतें, त्याकरितां पैशाची सोय करणें मला भाग होतें. जवळ एकहि डॉलर नव्हता. रिझर्व्ह बँकेच्या गव्हर्नरांची भेट घेतली. ते म्हणाले:—" भारत सरकारकडून या बाबतींत आम्हांस लिहून आलेलें नाहीं. तरी पण तुमच्या जवळ संयुक्त राष्ट्राचा खलिता असल्यामुळें अमेरिकन एक्सप्रेस कंपनीकडून ५० डॉलरपर्यंत रक्कम घेण्यास मी परवानगी देतों. " ही परवानगी मीं अमेरिकन एक्सप्रेस कंपनीस दाखविली. कंपनीच्या मॅनेजरनें मला ५० डॉलरच्या किंमतीचे रुपये देण्यास सांगितले. मी आश्चर्यचकित झालों. वेळ नसल्यामुळें मी

कांहीं बोलूं शकलों नाहीं. १० डॉलर आणि दोन पौंडाची रक्कम मीं घेतली व तेथून निघालों.

निघण्याचा दिवस जवळ आला. तिकिटाची काय सोय आहे म्हणून चवकशी करण्याकरितां मी एअर इंडिया इन्टरनॅशनल ऑफिसमध्यें गेलों. दिल्लीहून मला आलेल्या अनेक तारा मीं या कंपनीला दाखविल्या. मॅनेजर म्हणाले:—"आम्हांला तुमच्याबद्दल कांहींच माहीत नाहीं. त्यामुळें तुमची सीट रिझर्व्ह होत नाहीं, तुम्हाला लंडनला जावयाचें असेल तर तिकीट विकत घ्या—" घोटाळ्याचा खुलासा करण्यासाठीं मीं दिल्लीला अर्जंट तार ठोकली. मुंबईचा माझा पत्ता मॅनेजरला देऊन मी उदास व विमनस्क अंतःकरणानें रात्रीं घरी आलों. घरच्या मंडळींनीं अगदीं उत्सुकतेनें मला विचारलें, "काय हो, उद्यां विमान किती वाजतां निघणार ?" अर्धवट मनस्थितींत कांहीं तरी मी बोललों. त्यांनाहि अचंबा वाटला. अंथरुणावर तळमळत असतांनाच रात्रीं १२॥ ला एअर इंडिया इंटरनॅशनलचें पत्र आलें. "उद्यां सकाळीं सात वाजतां विमानतळावर हजर रहा—" मजकूर वाचतांच एक मोठा निश्वास सोडला मीं. नवीन नवीन कल्पना आणि विचारांच्या तंद्रींत सर्व प्रातर्विधि आटोपून आम्ही विमानतळावर आलों. तेथें वैद्यकीय तपासणी झाली. करोडगिरितिं सामानाची तपासणी झाली. पोंहचविण्यास आलेल्या आप्त व मित्र-मंडळींचा निरोप घेतला. विमानाच्या पायऱ्या चढतांना नकळत माझ्या डोळ्यांतून अश्रुधारा सुरू झाल्या. विमान भरतभूमि सोडीत असतांना मी—'यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः" हा गीतेंतला शेवटचा श्लोक म्हटला व माझा आकाशांतून प्रवास सुरू झाला.

---

# प्रकरण २ रें

ज्या विमानानें मीं मुंबई ते लंडन प्रवास केला त्यांचें नांव मलबार-प्रिन्स होय. हें चार इंजिनचें इंटरनॅशनल विमान दिसण्यास अत्यन्त भव्य होतें. पुढें तिरंगी झेंडा फडकत होता. आंत ४७ प्रवाशांना आराम-शीर बसण्यास कोचेस होते. आम्ही आंत जातांच होस्टेसनें आमचें हार्दिक स्वागत केलें. प्रवाशांच्या सुखसोईकडे या बाईचें नेहमीं लक्ष असें. मी हातांतील गरम ओव्हरकोट तिला दिला. तिनें दाख-विलेल्या कोचावर जाऊन बसलों. विमान निघण्यापूर्वीं सर्वांच्या कंबरेभोंवतीं पट्टा बांधला गेला का नाहीं तें ही स्त्री पाहते. मुंबई शहरावर आम्हीं दोन वर्तुळें घेतलीं व पश्चिमेच्या दिशेला विमान उडालें. कित्येक स्त्री-पुरुषांना विमान 'लागल्याची' ओरड ऐकूं येते. कांहींना कोरडी अथवा ओली ओकारी होते. यासाठीं प्रत्येकाजवळ कागदाचें एक पात्र ठेवलेलें असतें. होस्टेस सेवा करण्यास तयार असते. लवंग, वेलदोडे, पेपरमिंट व चॉकोलेटचें तबक ती फिरवीत असते. विमानांतून प्रवास करीत असतां काय काळजी घ्यावी या सूचनांची एक पुस्तिका, जगाच्या नकाशाचें एक पत्रक आणि चित्रांचीं मनोरंजक मासिकें प्रत्येक प्रवाशाशेजारी असलेल्या पिशवींत ठेवलेलीं असतात. मला विमान केव्हांच 'लागलें' नाहीं. मी नेहमीं बाहेरची मजा, देखावा पहात बसत असे. जेव्हां जेव्हां कानांत ठणका होई किंवा पोटांत कालवाकालव होई, त्यावेळेस मी प्राणायाम करून श्वास कोंडून ठेवी. शरीरांतील दाब अशा रितीनें वाढविल्यामुळें विमानाच्या हेलकाव्याचा किंवा वर खालीं जाण्यानें हवेच्या दाबाचा कांहींच परिणाम माझ्यावर होत नसे.

मुंबईला मागें टाकून आमचें विमान खालीं पाणी आणि वर ढग अशा वातावरणांतून जाऊं लागलें. अरबी समुद्राचा देखावा कांहींसा मीं पाहिला. नंतर खाली पांढरे ढग व वरती आकाश अशा स्थितींत कांहीं तास

आमचे गेले. दोन दोन तासांनीं कप्तान एक पत्रक काढीत असे व सर्व प्रवाशांमध्यें तें फिरविलें जाई. या पत्रकांत विमान चालविणाराचें नांव, होस्टेसचें नांव, विमान किती उंचीवर आहे, विमानाचा वेग, बाहेरचें उष्णतामान आणि विमान कोणत्या स्थळावरून जात आहे याची माहिती असे. यावेळेस विमानाचा वेग ताशीं ३०० मैल होता. इराक देशांतून जात असतां आम्हांला खालीं दूरवर पसरलेलें वाळवंट व कांहीं ठिकाणीं दाट खजुराची लागवड दिसली.

एक वाजतांचें जेवण आम्हीं विमानांतच घेतलें. बसल्या जागीं सर्वांना चौकोनी ट्रे दिला जातो. कोचाच्या दोन्ही हातांवर एक फळी तात्पुरती बसविण्याची सोय असते. त्यावर उशी ठेवून ट्रे ठेवावयाचा. मी शाकाहारी असल्यामुळें माझे खाण्याचे जिन्नस वेगळे होते. पण हे जिन्नस मीं कधींच न पाहिल्यामुळें व चमचे, काटे आणि सुरीचा उपयोग जन्मांत माहीत नसल्यामुळें माझ्या जेवणाची चांगलीच फजिती झाली. शाकाहारांत अंडीं व मासे दोहोंचाहि समावेश असे.

आमचें विमान बरोबर ४॥ वाजतां बसरा विमानतळावर उतरलें. विमानांतून बाहेर आल्यावर वाळवंटांतील उष्णता व ऊन वारे यांचा मला फार त्रास झाला. हा विमानतळ टाइग्रीस नदीकांठीं आहे. आम्ही सर्वजण नदीवर गेलों. तेथील एका नावेच्या फळीवर बसून इराकी लोकांबरोबर मूकभाषा सुरू केली. हे लोक राहणीनें गलिच्छ दिसले. बसरा गांव विमानतळापासून १५ मैलांवर आहे. टाईग्रीस नदीचा विस्तार बराच दिसला. नाईल नदी इजिप्तला समृद्ध करीत आहे तर इराकच्या वालुकामय भूमीला टाईग्रीस नदी सुपीक बनवीत आहे. येथें आमच्या विमानानें पेट्रोल घेतलें. बरोबर ५॥ च्या सुमारास विमान कायरो शहराकडे निघालें. त्याचवेळेस खालीं वाळूचें वादळ प्रचंड प्रमाणांत होत असल्यामुळें विमानानें हेलकावे घेण्यास सुरुवात केली. हा त्रास वांचविण्यासाठीं विमान वीस हजार फुटांवर नेण्यांत आलें. तेथें हवा विरळ भासूं लागली. सर्वजण डोळे झाकून स्तब्ध पडलेले होते. कायरोला

आम्ही रात्रीं ९ ला पोहोंचलों. बाहेर स्वच्छ चांदणें पडलें होतें. आल्हाददायक झुळुझुळू वारा वहात होता. आम्ही विमानतळाच्या भोजनगृहांत गेलों. तेथें जाण्यापूर्वी आमच्या पासपोर्टाची व आरोग्य-नोंदींची तपासणी झाली.

मिसरी मनुष्य हा अंगापिंडानें जाडा व गुबगुबीत असतो. सर्वांच्या डोक्यावर रुमी टोप्या दिसल्या. मी शाकाहारी आहे हें समजावून सांगण्यास एक इंग्रज दुभाषी बोलावण्यांत आला. द्राक्षें, खजूर व मोसंबीं येथें भरपूर मिळतात. पुढचा प्रवास कडक थंडींतून असल्यामुळें कित्येकांनीं ब्रँडी घेतली.

जिनेव्हाकडे जाण्यास आमचें विमान रात्रीं दहा वाजतां निघालें. सर्व रात्र खुर्चीलाच आरामखुर्चीचें रूप देऊन आम्ही झोपलों. होस्टेसनें एक एक उशी व एक ब्लँकेट दिलें. ११ ला सर्व दिवे मालवले. परन्तु एक मिणमिणीत लहानसा दिवा मात्र ठेवला होता. यावेळेस विमानाचा आवाज खूपच मोठ्यानें होत होता. खालती बर्फाच्छादित आल्पस् पर्वत चांदण्यामुळें स्पष्ट दिसत होता. याच ठिकाणीं सध्या मलबार प्रिन्स ज्या विमानांतून आम्हीं प्रवास केला—हें त्यांतील प्रवाशांसह आतां चिरंतन निद्रा घेत आहे.

---

# प्रकरण ३ रें

घड्याळाच्या वेगापेक्षां विमानाचा वेग जास्त प्रमाणांत होता. मला वरचेवर त्यामुळें वेळ बदलावी लागत असे. आल्पस् पर्वतावरून जात असतांना आम्ही वीस हजार फूट उंचीवर होतों. पहाटे चार वाजतांच पूर्वक्षितिजावर सूर्यदर्शन झालें. शुभ्र बर्फावर वक्रीभवन पावलेले सूर्य-किरण आकाशांत अनेक प्रकारचे रंग फेकीत होते. अशा रंगलेल्या आकाशांतून वाट काढीत आम्ही जिनिव्हाच्या विमानतळावर सहा

वाजतां सकाळीं आलों. विमानांतून बाहेर येतांच थंडी झोंबूं लागली. रिस्टॉरंटमध्यें जाऊन सकाळची न्याहारी केली. सर्व व्यवस्था येथील स्विस स्त्रियांकडे आहे. थोडीशी विश्रांति घेऊन आमचें विमान तेथून निघालें. विमान हजार दीड हजार फुटांवरून जात असल्यामुळें आणि आकाश निरभ्र असल्यामुळें शेती, खेडीं व शहरें पाहण्यांत आलीं. आमच्या कप्तानानें पॅरिस शहरावर मुद्दाम तीन चार वर्तुळें घेतलीं; दूरवर पसरलेले सरळ व रेखीव रस्ते, ऱ्हाईन नदी व तिचे कालवे, पूल, इमारती, पॅरिस शहराभोंवतीं असलेलीं खेडीं वगैरे बरींच दृश्यें आम्हीं पाहिलीं. नंतर इंग्लिश चॅनलचा देखावा दिसला. ९ वाजतां लंडन विमानतळावर आमचें विमान उतरलें. ह्यापुढचा प्रवास अमेरिकन एअर लाइनच्या विमानानें व्हावयाचा असल्यामुळें व या वेळेस अमेरिकेला जाणारें विमान तयार नसल्यामुळें मीं येथें आठ तास मुक्काम केला. पासपोर्ट वगैरेची तपासणी झाल्यावर एअर पोर्टच्या ऑफिसमध्यें माझें सामान ठेवलें आणि लंडन शहर पाहण्यास निघालों. प्रथमतः अमेरिकन एअर लाईनच्या कचेरींत येऊन पुढच्या प्रवासाचें तिकीट मीं काढलें. नंतर कांहीं वेळ टॅक्सींत, बसमध्यें व पायीं जितकें फिरणें शक्य आहे तितकें फिरून मीं शहर पाहिलें. अंधशिक्षणाकरितां लागणारीं उपकरणें तयार करण्याची संस्था पाहिली. येथूनच हैद्राबादच्या अंधशाळेला आवश्यक असलेलीं उपकरणीं मागवीत असल्यानें माझें नांव येथील सेल्स मॅनेजरला अगोदरच माहीत होतें. माझ्या पत्रव्यवहाराची एक मोठी फाईल त्यांनीं मला दाखविली. 'आमच्या इंग्लंडमध्यें सुद्धां, अंधमूक शिक्षणाची सोय व व्यवस्था निरीक्षणाला योग्य आहे' असें ते म्हणाले. "हें सर्व खरें, पण मला अमेरिकेस जाण्याचा सन्देश आल्यामुळें मी येथें राहूं शकत नाहीं" असें म्हणून त्यांचा निरोप घेऊन मी तेथून निघालों. फूटपाथवर माणसांची बरीच गर्दी दिसली. त्यांत स्त्रियांचा भरणा जास्त. इतके इंग्रज कधींच न पाहिल्यामुळें माझें मन जरा गोंधळलें. कोणी कांहीं विचारतील का?

कोणी रस्त्यांत अडवील का ? अशा मनस्थितींत मी भटकत होतों. येथील प्रसिद्ध राजवाड्याचा पुढील भाग, हाईडपार्क, ट्यूबरेल्वे, ऑक्सफर्ड स्ट्रीट वगैरे पाहिलीं. या कामांत पोलिसांची मदत मला फार झाली. अत्यन्त नम्रतेनें त्यांनीं विचारपूस करून मला सर्व माहिती दिली. बाकिंगहॅम पॅलेससमोर बॅंड वाजविणारांचा सुमारें शंभर माणसांचा एक ताफा पाहिला. त्यांची शिस्त, वाद्यें वाजविण्याची पद्धत, एकाग्रता व एकतालता वाखाणण्यासारखी होती. किती तरी वेळ मी तेथें उभा होतों. गेल्या महायुद्धांत लंडन शहरावर जर्मनींनें पुष्कळ वेळां बॉम्ब फेकले, त्यायोगें कित्येक इमारती धुळीला मिळाल्या आहेत; त्यांच्या खुणा अद्यापीहि दृष्टीस पडतात. फुटपाथवरून हजारों माणसांची रीघ लागलेली, पण गोंगाट नाहीं. दुकानें माणसांनीं फुललेलीं, पण चोहोंकडे शान्तता. बसेस हैदराबादेंतील डबल बसप्रमाणेंच, परन्तु बसचें तिकीट देतांना व घेतांना परस्पर 'थँक्यू' म्हणावयाची पद्धत आहे. मला येथें अजून बरेंच पहावयाचें होतें, पण संध्याकाळचे पांच वाजल्यामुळें मी घाईघाईनें विमानतळावर आलों. दिवसभर बराच फिरलों त्यामुळें मला जरा थकवा आला होता. त्यांतून खाणें नसल्यामुळें मी फारच गळालों. न खाण्याचें कारण इंग्लिश रेस्टारंटमध्यें जाऊन जेवण्याची पद्धत मला बिलकूल माहित नव्हती, व येथील लोक आपल्याला रानटी म्हणतील. अशी भीति. त्यामुळें मला बरेच उपवास घडले.

ठीक सहा वाजतां 'स्वीडन' नांवाच्या अमेरिकन विमानानें आम्हीं विमानतळ सोडला. रात्रीं ९॥ वाजतां आयर्लंडमध्यें शिनॉन विमानतळावर आम्ही उतरलों. येथें जेवण घेतलें. माझ्या टेबलाशेजारी झेकोस्लोव्हाकियाचें एक वृद्ध जोडपें ज्यांना इंग्रजी भाषा समजत नसे—व एक अमेरिकन तरुणी बसलेली होती. ती एका श्रीमान् अमेरिकन कारखानदाराची मुलगी होती. जग पहाण्याची तिला मोठी आवड ! तिची व माझी पुष्कळ दिवसांची ओळख आहे अशाच तऱ्हेनें ती माझ्याशीं बोलत होती. तिनें मला विचारलें—आपण कोठून आला व कोठें जाणार ? न्यूयॉर्कचा तिला

फार अभिमान दिसला. ‘मी तिकडेच जात आहें’—असें मीं तिला सांगितलें. ती हस्तांदोलन करून म्हणाली ‘अमेरिकेतर्फे मी आपलें स्वागत करतें’—पंडित नेहरूबद्दल तिनें धन्योद्गार काढले. ‘—जगांत शांतता नांदावी याकरितां त्यांचें जीवन आहे. मी मुद्दाम भारतांत जाऊन त्यांना भेटणार आहें’—असा मनोदयहि तिनें व्यक्त केला. तिच्या मदतीनें मी शाकाहारी जेवण मागविलें. रात्रीं १०॥ ला आम्हीं आयर्लंड सोडलें. या विमानांत मी एकटाच हिंदी मनुष्य. ४५ माणसांची सोय यांत होती. पण आम्ही तेराच जण होतों. या विमानाचा सर्वच थाट निराळा दिसला मला.

---

## प्रकरण ४ थें

ॲटलँटिक महासागरावरून विमान जातांना रात्र असल्यामुळें आम्ही आमच्याच खुर्चीवर पूर्ण विश्रान्ति घेतली. पहाटे तीन वाजतांच महासागराच्या लाटा दिसूं लागल्या. आकाश निरभ्र असल्यामुळें व वादळी हवा नसल्यामुळें एक हजार फुटांवरून विमान चाललें होतें. क्वचित् ठिकाणीं एखादें जहाज दिसे. पहाटे पांच वाजतांच मीं प्रातर्विधि उरकून घेतला. स्त्री-पुरुषांकरितां निरनिराळी व्यवस्था होती. दाढी करून घेण्याकरितां एक मशीन, टॉवेल्स, साबण, ऊनपाणी वगैरे एका लहान केबिनमध्यें ठेवलें होतें. तीनापेक्षां जास्त माणसें आंत जाऊं देत नसत. विमानाचा तोल सांभाळण्यासाठीं ही खबरदारी घेण्यांत आली होती.

सकाळीं सहा वाजतां आम्हीं अमेरिकेचा किनारा गांठला. पुष्कळ ठिकाणीं तळीं व क्वचित् ठिकाणीं हिरवळ दिसूं लागली. होस्टेसनें (इकडे तिला पर्सर म्हणतात) न्याहारी आणली. खाण्याचे अनेक पदार्थ अत्यंत आकर्षक रीतीनें ट्रेमध्यें ठेवलेले होते. बाहेरचे देखावे पहात माझा फराळ झाला. ८॥ वाजतां विमान न्यूयॉर्क शहरावर आलें. अनेक तळीं, समुद्र व नद्यांचें पाणीच पाणी पसरलेलें होतें. ज्या ठिकाणीं जमीन असेल तेथें तेथें शहर वसलेलें दिसलें. या वेळेसच अकस्मात् ढग येऊन

मुसळधार पावसास सुरुवात झाली. पाऊस पडत असतांनाहि शहराचा देखावा दिसला. विमानानें आकाशांत चार पांच वर्तुळें घेतलीं आणि तें जगांतील अत्यंत प्रसिद्ध व मोठ्या विमानतळावर उतरलें. या तळाचें नांव– 'ला गार्डिया एअर पोर्ट' आहे. अमेरिकन सरकारतर्फें एक ऑफिसर विमानांत आले व त्यांनीं आमचे जनता व सरकारतर्फें आभार मानले. आमचा प्रवास अत्यंत सुखाचा व सुरक्षित झाला याबद्दल त्यांनीं आमचें अभिनंदन केलें. नंतर आम्ही खालीं उतरलों. खालीं उतरल्या-बरोबर पावसाळी गारव्यानें मी अगदीं सर्द झालों. चार पावलें गेल्यानंतर विमानतळाची कचेरी लागली. ही इमारत एअर कंडिशन्ड असल्यामुळें आंतील उष्णता फारच सुखाची वाटली मला. इमिग्रेशन ऑफिसरांची तपासणी फार कडक झाली. मी कशाकरितां आलों, माझीं राजकीय मतें, पैसा, अमेरिकेंत उदरनिर्वाहाची माझी जबाबदारी वगैरेंची विचारणा झाली. माझ्या पासपोर्टची आणि व्हिसाची फार कसोशीनें तपासणी केली. पासपोर्टवरील फोटो व मी एकच आहे का नाहीं याची खात्री दोघां ऑफिसरांनीं करून घेतली. हेड टॅक्स म्हणून माझ्याकडून आठ डॉलर घेण्यांत आले. नंतर हेल्थ डिपार्टमेंटमध्यें माझी तपासणी झाली. देवी, कॉलऱ्याविरुद्ध टोंचून घेतलेल्या खुणा व सर्टिफिकिटें त्यांनीं बघितलीं. माझें हेल्थ सर्टिफिकीट हैदराबादचे डॉ. माईनकर–स्कूल मेडिकल इन्स्पेक्टरकडून घेतलेलें होतें. पण येथील हेल्थ ऑफिसरनें त्याला मान्यता दिली नाहीं. हैदराबाद कार्पोरेशनच्या डॉक्टरांचा दाखला पाहिजे व तो सुद्धां आंतरराष्ट्रीय आरोग्यखात्यानें ठरविलेल्या फॉर्मप्रमाणें असावा असें त्यांनीं मला सांगितलें. मला अमेरिकेंत उतरूं द्यावें का परत पाठवावें याबद्दल लगेच त्यांनीं एक कमिटी बसविली. निर्णय झाला कीं, दररोज असे १५ दिवस मीं न्यूयॉर्क कार्पोरेशन हेल्थ ऑफिसरकडे दहा वाजतां जावें व आरोग्याची तपासणी करून घ्यावी. हीं दोन्हीं खातीं संपल्यावर मी कस्टम ऑफिसमध्यें आलों. माझ्या बॅगमधील प्रत्येक जिन्नस तपासण्यांत आली. हैदराबादेहून

नेलेली खोबरेल तेलाची माझ्याजवळ एक बाटली होती. त्यांना कळेना कीं, बाटलींत ही घट्ट झालेली पांढरी वस्तु काय आहे. माझ्याजवळ संशयास्पद अशी एकहि वस्तु नसल्यामुळें मी लवकरच येथून निसटलों. नंतर मी एअरपोर्टच्या विस्तीर्ण अशा वर्तुळाकार लॉबमिध्यें आलों. येथें जनसमूह अफाट होता. विमानांतून उतरलेल्या आपल्या मित्रांना व आप्तेष्टांना घेऊन जाण्यास स्त्री, पुरुष व मुलांची चिक्कार गर्दी झाली. कांहीं जणांच्या कित्येक वर्षांनीं भेटी होत होत्या, ते एकमेकांना आलिंगन देत होते व त्यांच्या गालांवरून अश्रुधारा वहात होत्या. अशा प्रसंगीं स्त्री, पुरुष, वृद्ध, तरुण वगैरे कांहीं भेद नव्हते. कधीं न पाहिलेला देखावा पहात असतांना मला अफाट जनसमुदायांत कोणीच विचारीत नाहींत, आतां मीं कोठें जावें व काय करावें अशा विचारांतच मी एका कोचावर येऊन बसलों. निरनिराळ्या तऱ्हेच्या जाहिराती व चित्रें भिंतीला ठिकठिकाणीं लावलेलीं होतीं. मन रमविण्याचा आटोकाट प्रयत्न केला मीं, पण व्यर्थ. शेवटीं इन्क्वायरी ऑफिसची पाटी पाहिली. तेथें १५–२० तरुण स्त्रिया कानाला टेलिफोन लावून कागदावर टिपण करीत होत्या. माझ्याजवळ युनायटेड नेशन्सच्या फेलोशिप ऑफिसरचें नांव व त्यांचा टेलिफोन नम्बर होता. पण येथील टेलिफोन पद्धति मला मुळींच माहित नव्हती. कामांत निमग्न असलेल्या एका परक्या स्त्रीस कसें विचारावें याचाच मी विचार करूं लागलों. शेवटीं निश्चय करून मी तेथें गेलों. तेथील एका स्त्रीस माझी सर्व हकीगत सांगितली. तिनें मला पंधरा मिनिटें वाट पहाण्यास सांगितलें. सुदैवानें पांच मिनिटांतच युनायटेड नेशन्सची एक रोलसराइस-सारखी उत्तम मोटार घेऊन एक गृहस्थ आले. मीच तो माणूस आहे असें ओळखून त्यांनीं मला मोटारींत बसण्यास विनंती केली. त्यांनीं माझी बॅग उचलली व आम्ही मोटारींत बसलों. त्याचे ते उंची कपडे व भव्य शरीरयष्टि बघून मला तो ऑफिसर असावा अशी शंका आली. परन्तु तो ऑफिसर नसून यू. एन्. चा एक मोटार ड्रायव्हर होता.

---

# प्रकरण ५ वें

न्यूयॉर्कमधील ‘ला गार्डी’ या विमानतळाचा विस्तार जगांतील कोणत्याही विमानतळापेक्षां जास्त आहे. सरासरी एका मिनिटाला येथें दोन विमानें उतरतात व दोन विमानें परदेशाला जातात. त्यामुळें गर्दी भयंकर. अशा गर्दींतून मी वाट काढीत युनायटेड नेशनच्या मोटारींतून शहराच्या मध्यवस्तींतील एका भव्य हॉटेलमध्यें आलों. येथें पंधराव्या मजल्यावर मला एक खोली मिळाली. आपोआप चालणाऱ्या अेलिव्हेटर-मधून मी वर गेलों. माझ्याबरोबर हॉटेलचा एक नोकर होता. या खोलीचें रोजीं भाडें १२ रु. होतें. खोलींत जीवनाला आवश्यक अशा सर्व सोई होत्या. रेडिओ, टेलिफोन होता. बाथरूममध्यें ऊन व थंड पाण्याचे नळ, एक मोठा चायना टब, चार टर्किश टॉवेल्स, दोन नॅप-किन्स वगैरे सामान व्यवस्थित ठेवलें होतें. फर्निचरमध्यें एक प्रशस्त पलंग, एक कोच, टेबल-खुर्ची, चेस्ट ड्रॉवर, कपडे ठेवण्याचें कपाट वगैरे नुकतेंच पॉलिशपेंट केल्याप्रमाणें चमकत होतें. पलंगावर गादी, त्यावर स्वच्छ चादर, दोन उशा व पांघरण्यास रग्ज ठेविलेले. प्रत्येक कपाटाच्या दर्शनी भागावर आरसे बसविलेले, स्नानगृहांत दोन्ही बाजूच्या भिंती पूर्ण आरशाच्या, पडून वाचीत असतांना फक्त पुस्तकावरच उजेड पडेल असा दिवा, हें सर्व पाहून मला या खोलींत चैन पडेना. स्नान आटोपून मी जरा वेळ बसलों. टेलिफोन कोठें करावा हेंच मुळीं मला कळेना. हॉटेलमधून माझें जेवण खोलींत येईल याची बराच वेळ वाट पाहिली मीं; पण कशाचाच पत्ता नाहीं. हळूच दरवाजा उघडून बाहेरच्या कॉरिडरमध्यें आलों. तितक्यांत एक स्त्री तेथून जात असलेली मला दिसली. मला पाहून ती थक्कच झाली. माझा तो लांडा पंचा व शर्ट पाहून ती म्हणाली, “ — तुम्हाला कांहीं वाटत नाहीं ? मी बाईमाणूस आहे, तुम्ही आपल्या पिंढऱ्या व गुडघे मला दाखविता ! मी तुमचें नांव मॅनेजरला जाऊन सांगतें” — मी जरा ओशाळलों व म्हणालों “ — मी आत्तांच हिंदुस्थानांतून

आलों आहें. मला इकडील रीतभात माहीत नाहीं. आपण मला क्षमा करा आणि असा प्रसंग पुन: माझ्यावर येऊं नये म्हणून मी काय करूं तें सांगा."

ती म्हणाली —"बाथरोब विकत घ्या. तुमचें हें लक्षण लज्जास्पद आहे मला." अज्ञानाची कबुली दिली मीं. माझे जेवण्याचें ताट कां येत नाहीं म्हणून चवकशी केली मीं तिच्याकडे. तिनें समजावून सांगितलें कीं, हॉटेल फक्त राहण्याचें ठिकाण; जेवण्यास दुसरीकडे जावें लागतें आणि त्याला रिस्टॉरंट किंवा कॅफेटेरिया म्हणतात. तिचा निरोप घेतला व दरवाजा बंद करून पलंगावर मी विचार करीत पडलों. इतक्यांत टेलिफोनची घंटी वाजली. हॅलो, रामचंद्रराव !

---

# प्रकरण ६ वें

टेलिफोनमधून अशा अपरिचित शहरांत माझ्या नांवानें कोण हांक मारीत आहे याबद्दल मला आश्चर्य वाटलें. विचारणा केल्यावर समजलें कीं, लेकसक्सेसच्या आंतरराष्ट्रीय सामाजिक शाखेच्या एका प्रमुखानें माझी चवकशी केली. तो म्हणाला, " तुम्ही नव्या ठिकाणीं आला आहांत म्हणून भांबावून जाऊं नका. हे पहा राव, मी तुमच्याकडे बरोबर एक तासानें दोन हिंदी गृहस्थ पाठवितों. ते तुम्हाला जेवण्यास घेऊन जातील." माझी काळजी वाहणारीं अशीं अज्ञात माणसें या अफाट शहरांत सुद्धां आहेत हें पाहून मला फार आनंद झाला. व्यवस्थित कपडे चढवून समोर असलेल्या माझ्या एवढ्या आरशांत माझें प्रतिबिंब पहात व एका तासानें येणारे हे हिंदी गृहस्थ कोण असावेत याचा विचार करीत मी माझ्या खोलींत येरझारा घालूं लागलों. तितक्यांत फोनकॉल आला, " खालीं या. आपण एका रिस्टॉरंटमध्यें जेवण्यास जाऊं." एलिव्हेटरमधून खालीं आलों तोंच त्या दोघा हिंदी गृहस्थांनीं माझ्याशीं हस्तांदोलन करून

माझें स्वागत केलें. हे गृहस्थ इंडियन डेलिगेशन ऑफिसमधील अधिकारी होते. त्यांनीं मला सर्व तऱ्हेच्या मदतीचें आश्वासन दिलें. नंतर रस्त्यानें गगनचुंबी इमारती पहात आम्ही निघालों. दोन चौक ओलांडले. रस्त्यावर मोटारींची सारखी रीघ, तर फुटपाथवर स्त्रीपुरुषांची गर्दी. बेंगाल गार्डन नांवाच्या एका रिस्टॉरंटमध्यें आम्ही आलों. हें एका बंगालमधील हिंदूनें आज चोवीस वर्षें येथें चालविलें आहे. अशा रितीचीं हिंदी रिस्टॉरंट्स न्यूयॉर्कमध्यें चार आहेत. येथें दोन्ही—अमेरिकन अन् हिंदी पद्धतीचें जेवण तयार केलें जातें. विशेषतः हिंदुस्थानी लोकांना आवडतील असे शाकाहारी आणि मांसाहारी पदार्थ येथें तयार केले जातात. मालकास भेटून हिंदी भाषेंत आम्ही एकमेकांची ओळख करून घेतली. या रिस्टॉरंट-मधील अंतर्व्यवस्था अमेरिकन वैभवाची परंतु हिंदी संस्कृतीस धरून होती. भिंतींवर ताजमहालपासून अजिंठ्यापर्यंत सर्व रंगीत चित्रें चितारलेलीं दृष्टीस पडलीं. पायाखालीं भारतीय गालिचा तर टेबलावर बिद्री कलेचा पुष्पकरंडक. आम्हीं हिंदी जेवण मागविलें. सर्व जेवण ताजें व स्वच्छ होतें. जेवण झाल्यानंतर मुखशुद्धीकरितां आम्हांला बडीशेप देण्यांत आली. या जेवण्याचे प्रत्येकीं साडे नऊ रुपये झाले.

माझ्या हिंदी मित्रांनीं माझा निरोप घेतला व ते निघून गेले. कांहीं खुणा लक्षांत होत्या त्या बघतच मी माझा मार्ग आक्रमित होतों. शेवटीं मी हॉटेलमध्यें येऊन पोहचलों. माझ्याजवळील सर्व डॉलर्स संपून गेले होते. त्यामुळें मी जरा विचारांतच होतों. अशा चिंतामग्न स्थितींत फोन आला,—" या विशिष्ट जागीं आपण सकाळीं नऊ वाजतां उभे रहा. घेऊन जाण्यास मोटार येईल. लेकसक्सेसला आल्यानंतर पुढील कार्यक्रम ठरविण्यांत येईल. "

संध्याकाळचे पांच वाजले. एक महिन्याच्या अविश्रांत दगदगीमुळें मला फारच शीण आला होता. 'होमसिकनेस' चा या वेळीं मला बराच अनुभव आला. पृथ्वीचा गोल पहा. भारताच्या विरुद्ध बाजूला अमेरिका. दोन दिवसांत मी दहा हजार मैलांवर फेकला गेलों. भारतांत पुनः केव्हां

जाईन मी ! हैदराबादेंतील रस्ते, मित्रमंडळी वगैरे माझ्या उघड्या व क्वचित् झांकलेल्या डोळ्यापुढें स्पष्ट रीतीनें कांहीं वेळ येऊन अंतर्धान पावत. रात्रभर शांत झोप कांहीं लागली नाहीं मला. शरीर न्यूयॉर्कमध्यें पण मन पूर्णपणें हैदराबादेंत. दुसऱ्या दिवशीं सकाळचे विधी व आन्हिक आटोपून मी ठरल्याप्रमाणें लेकसक्सेसला गेलों. जगप्रसिद्ध हेंच तें लेकसक्सेस !

---

# प्रकरण ७ वें

लेकसक्सेस हा न्यूयॉर्कच्या आसमंतांतील एक भाग आहे. हा शहराच्या मध्यवस्तीपासून सुमारें वीस मैलांच्या अंतरावर आहे. लेक-सक्सेसला लेक्स म्हणजे तळीं असतील अशी आपली समजूत होणें शक्य आहे. परन्तु गवळीगुडा, चमन व पुतळीबावडी जशी आहेत, त्याचप्रमाणें लेकसक्सेस आहे. येथील संयुक्त राष्ट्राच्या कचेरीचा विस्तार फार मोठा आहे. भोंवतील प्रदेशांत दाट झाडी, हिरवळ, विस्तृत रस्ते व रस्त्याच्या बाजूनें दूर दूर अंतरावर असलेले झोपडीवजा एक मजली बंगले आणि त्या बंगल्याच्या चारी बाजूला लतांच्या रंगीबेरंगी फुलांचे ताटवे असलेल्या रम्य अशा नैसर्गिक कोंदणांत संयुक्त राष्ट्रांची एक मजली इमारत वसवली आहे. महायुद्धाच्या काळांत येथें विमानतळाची कचेरी होती. ही इमारत सुमारें दोन एकर जमिनीवर पसरली आहे. याला आंत जाण्यासाठीं स्प्रिंगचे अनेक दरवाजे आहेत. इमारतीचा दर्शनी भाग जो समजला जातो तेथें उंचावर संयुक्त राष्ट्राचा एक झेंडा फडकत असतो. त्या झेंड्यासमोरील हिरवळी मैदानावर संयुक्त राष्ट्रकुलांत सामील झालेल्या राष्ट्रांच्या पताका मोठ्या वर्तुळाच्या पंधरा पंधरा फूट उंचीच्या दांडीवर फडकत असतात. या जागतिक एकी-करणाच्या भूमीवर आपला तिरंगी झेंडा पाहून मला खूप आनंद

झाला. येथें कॅमेरेवाल्यांची गर्दी फार असते. मीहि माझ्या कॅमेऱ्यानें तिरंगी झेंडा हवेंत फडकत असतांना फोटो घेतला. नंतर झेंड्याखालीं उभे राहून नमस्ते करीत असतांना एका रशियन माणसाकडून माझ्या



तिरंगी झेंडा—लेकसक्सेस

कॅमेऱ्यानें माझा फोटो काढून घेतला. आपल्या झेंड्याला अत्यंत आदरानें व कौतुकानें पहाणारे व त्या झेंड्याजवळ विश्रांति घेणारे कित्येक स्त्री-पुरुष येथें दिसून येतात. निरनिराळ्या राष्ट्रांच्या झेंड्यांचा रंग व त्यावरील राष्ट्रीय चिन्हें पहात कित्येक लोक तासन्‌तास उभे रहातात.

ऑफिसचा अंतरभाग हजारों खोल्या, दिवाणखाने व दालनांनीं व्यापला गेला आहे. सर्वत्र सारखेपणा असल्यामुळें आपण चक्रव्यूहांत भ्रमण करीत आहोंत असा नेहमींच मला अनुभव येई. मी आंतरराष्ट्रीय सामाजिक सुधारणेच्या ऑफिसमध्यें काम करीत असे. येथें असलेल्या चौकशी कचेरींत हवी ती माहिती आपल्याला मिळते. निरनिराळ्या शाखांची वर्गवारी करून हजारों खोल्यांना व दिवाणखान्यांना नंबर देऊन आणि येथें काम करणाऱ्या स्त्री-पुरुषांची डिरेक्टरी व त्यांचा टेलिफोन नंबर देऊन या कचेरीनें बरीच सोय केली आहे.

या इमारतींत कृत्रिम हवामान व सूर्यप्रकाशाप्रमाणें उजेड केल्यामुळें इमारतीच्या बाहेर होत असलेल्या नैसर्गिक फरकाचा आंतमध्यें माग-मूसहि नसतो. एकदां काय झालें, मी दुपारीं दोन वाजतां आंतमध्यें गेलों. इमारतीच्या बाहेर व आंत सारख्याच प्रमाणांत उजेड होता. कामामुळें घड्याळहि पाहण्यास वेळ मिळाला नाहीं मला. काम संपवून मी इमारतीच्या बाहेर आलों, तर आकाशांत तारे व चोहोंकडे विजेचे दिवे चमकत होते. घड्याळांत पाहिलें तों सात वाजून गेले होते. यु. एन्. ऑफिसच्या व्यतिरिक्त येथें पोस्ट ऑफिस, बँका व एक हजार लोक एका वेळेस जेवावयास बसतील इतका मोठा कॅफेटेरिया आहे. मध्यवर्ती ग्रंथालयाशिवाय अनेक शाखांचीं लहान लहान ग्रंथालयें त्या शाखेला संलग्न आहेत. संयुक्त राष्ट्राचे मुख्य सहा भाग आहेत. (१) जनरल असेंब्ली (२) सेक्युरिटी कौन्सिल (३) एकॉनामिक व सोशल कौन्सिल (४) ट्रस्टशिप कौन्सिल (५) आंतरराष्ट्रीय न्यायालय (६) सेक्रेटरीएट. या एकेका भागाच्या अनेक शाखा आहेत. या सर्वांच्या घटनेचा अभ्यास करण्याकरितां मला पांच दिवसांची मुदत दिली होती.

मी एकदां असेंब्लीच्या बैठकीला हजर होतों. अर्ध गोलाकारांत राष्ट्रांचे प्रतिनिधी बसलेले होते. त्यांच्या टेबलावर लेखनसाहित्य व आपआपल्या राष्ट्रांच्या नांवाची पाटी होती. प्रेस–रिपोर्टर एका बाजूला बसले होते. जनरल सेक्रेटरी व शाखेचे अध्यक्ष जरा उच्चासनावर स्थानापन्न झालेले दिसले. माझा नंबर व्हिजिटर्सच्या रांकेंत लागला. त्यावेळेस फ्रान्सच्या प्रतिनिधीचें भाषण फ्रेंच भाषेंत चालू होतें. येथें असलेल्या प्रत्येक खुर्चीला बायनॉक्युलरप्रमाणें सायमल्टेनियस इंटर-प्रीटर या नांवाचें यंत्र अडकविलेलें असतें. दोन्ही कानाला पट्टी बांधल्या-प्रमाणें व एका हातांत यंत्र धरून इंग्रजी भाषेच्या नंबरची किल्ली फिरवावी, तोंच हें भाषण भाषांतरित होऊन आपल्याला इंग्रजीमध्यें ऐकूं येऊं लागतें. हें भाषांतरित भाषण फक्त एकट्यालाच ऐकूं येतें. शेजारी बसलेली व्यक्ति हेंच भाषण इतर भाषेंत ऐकूं शकते. यंत्राच्या

आवाज लहान-मोठा करण्याकरितां एक किल्ली असते. अनेक भाषा जाणणारा विद्वान् व्याख्यात्याच्या भाषणाचें त्वरित भाषांतर करून मायक्रोफोनवरील इंटरप्रीटरमधून ते प्रसृत करतो.

असेंब्लीची बैठक ही अगदीं गंभीर स्वरूपाची असते. संयुक्तराष्ट्राच्या सनदेप्रमाणें सर्वांचा दर्जा जरी सारखा असला तरी पण चार मोठ्या राष्ट्रांचें वर्चस्व येथेंहि दिसून येतें. कॅफेटेरियामध्यें जेवणाच्या टेबलावर मात्र पूर्ण समानता आहे. वरिष्ठ अशा अध्यक्षापासून तों माझ्या-सारख्या निरीक्षकापर्यंत सर्वांनीं आपले ट्रे घेऊन रांगेंत उभें रहावयाचें. नंतर आपल्या नंबरप्रमाणें पुढें सरकत सरकत जेवणाचे पदार्थ जेथें ठेवलेले असतात तेथें येऊन पाहिज ते पदार्थ घ्यावयाचे व ताट घेऊन परत येतांना बिल देऊन टाकावयाचें. पुढील किंवा मागील व्यक्तीबरोबर ओळख असो वा नसो ते एकमेकांशीं बोलतात. त्यामुळें मला बरीच माहिती मिळाली. रोजच्या समानतेच्या अनुभवानें माझा न्यूनगंड दूर झाला व आपणहि राष्ट्राच्या अध्यक्षाप्रमाणें एक जबाबदार घटक आहोंत असें मला वाटूं लागलें.

माझ्या शाखेच्या मुख्य अधिकाऱ्यानें स्वतंत्र रीतीनें मला अमेरिकेंत प्रवास करण्याचा परवाना व प्रमाणपत्र दिलें. प्रवासांत कोणी अडविल्यास किंवा संकटें आल्यास ताबडतोब तसें कळविण्यास सांगितलें. ते पुढें म्हणाले, “अमेरिकन लोक तऱ्हेतऱ्हेचे प्रश्न विचारतील तुम्हांला, व्याख्यानें ठेवतील, खाजगी संभाषणें घडवून आणतील, तेव्हां राजकीय मतें प्रगट न करतां या सर्वांस सावधगिरीनें तोंड द्या. जाती—जातींत किंवा राष्ट्राराष्ट्रांत वैमनस्य उत्पन्न होईल असें भाषण, लेख किंवा वागणूक माझ्याकडून होऊं नये” म्हणून मला लेखी इशारा देण्यांत आला. एक महिन्याच्या स्कॉलरशिपची रक्कम मला देण्यांत आली. पुढील चेक माझ्या प्रवासाच्या नोंदीप्रमाणें त्या त्या मुक्कामाला पाठवि-ण्याची व्यवस्था करूं असें त्यांनीं मला सांगितलें. माझ्या फेलोशिपच्या काळांतील माझा पगार, प्रवासखर्च व पुस्तकांकरितां मंजूर झालेल्या रक-मेच्या अंदाजपत्रिकेची एक नक्कल मला देण्यांत आली.

---

# प्रकरण ८ वें

संयुक्त राष्ट्रानें अमेरिकेंत प्रवास करण्याचा परवाना व प्रमाणपत्र आणि एक महिन्याची खर्चाची रक्कम दिल्यामुळें मला बराच धीर आला. माझ्या कामाचा मासिक अहवाल पाठविणें व दर पंधरवड्याला लागणाऱ्या खर्चाची रक्कम मागविणें यापलीकडे माझा या कचेरीशीं कांहींच संबंध राहिला नाहीं. वॉशिंग्टन राजधानीच्या मध्यवर्ती सरकारच्या देखरेखीखालीं मला आतां काम करावयाचें होतें.

न्यूयॉर्कमध्यें अंध–मूक शाळा व प्रौढ अंधांकरितां अनेक औद्योगिक संस्था आणि कारखाने आहेत. या सर्व संस्थांची यादी मला देण्यांत आली. कोणत्या संस्थेला केव्हां भेट द्यावयाची व त्या संस्थेंत किती दिवस मीं निरीक्षणाचें कार्य करावयाचें याचें पूर्ण स्वातंत्र्य मला देण्यांत आलें होतें. फेडरल सरकारकडून या संस्थांना माझी भेट देण्याची तारीख व तेथील माझा मुक्काम किती दिवसांचा आहे वगैरे अगाऊ सूचना देण्यांत येत असे आणि तसेंच मलाहि तें कळवीत असत.

येथें मी आतां हळूहळू स्वतंत्रपणें व धिटाईनें फिरूं लागलों. ज्या हॉटेलमध्यें मी उतरलों होतों तेथें आतां मला एकलकोंडें वाटूं लागलें व रोजचें भाडेंहि जास्त म्हणून वाय्. एम्. सी. ए. च्या संस्थेंत मी रहावयास गेलों. मी ज्या शाखेंत सुमारें दीड महिना राहिलों, त्या शाखेच्या इमारतींत दोन हजारांवर खोल्या होत्या. सर्व सुखसोईनीं सुसज्ज असलेल्या या सिंगल रूम्सचें भाडें अमेरिकेच्या मानानें स्वस्त असे. या संस्थेंत प्रवाशांना आठ दिवसांपेक्षां जास्त दिवस राहण्याची परवानगी नाहीं. पण भारतीय विद्यार्थ्यांना व प्रवाशांना खास सवलती येथें दिल्या जातात. या सोळा मजली इमारतीच्या खालच्या मजल्याच्या हॉलमध्यें चोवीस तास माणसांची ये–जा असे. येथें दररोज करमणुकीचे कार्यक्रम, व्याख्यानें, टेलिव्हिजन वगैरेंचे कार्यक्रम होत. पत्ते, बुद्धिबळ, ड्राफ्ट, स्त्रीपुरुषांचें मिश्र नृत्य पहाण्यास व त्यांत भाग घेण्यास सर्वांना

मोकळीक असे. दैनिकें, सचित्र मासिकें, साप्ताहिकें व्यवस्थित रीतीनें एका हॉलमध्यें ठेवलेलीं असत. एका मजल्यावर एका मोठ्या हौदांत पोहण्याची व्यवस्था केली होती आणि तेथेंच बॅस्केटबॉल, व्हॉलीबॉल, टेनिस वगैरे खेळ खेळण्याची सोय होती. वेट लिफ्टिंगच्या व्यायामाची सोय मोठमोठ्या हॉलमध्यें केली होती. एका हॉलमध्यें लेखनाकरितां लागणारें कागद, दऊत, टाक हें साहित्य मांडून ठेवलेलें असें.

अनोळखी व अपरिचित माणूस कोठेंहि चुकूं नये म्हणून खास कचेरी उघडण्यांत आली आहे. तेथें न्यूयॉर्क शहराचे नकाशे व देखावे एका फिरत्या स्टँडवर लाविलेले होते. याशिवाय शहराच्या नकाशांच्या लहान लहान प्रतींची रास येथें ठेविलेली असते. केव्हांही आपल्याला एक प्रत विनामूल्य मिळते. इतकीं माणसें येथें रहात पण गोंगाट, गडबड कांहीं नसे. सर्व कामें यंत्राप्रमाणें सुरळीत चाललेलीं दिसत. आपण कामाकरितां बाहेर गेलों तर व्यवस्थापकाकडे आपोआप आपल्या नांवाची नोंद होते. आपल्या गैरहजेरींत आपल्याकरितां आलेले टेलिफोन संदेश व भेटीला आलेल्या माणसांचीं नांवें आणि निरोप एका चिठ्ठीवर लिहून खोलीच्या नंबरचा एक कप्पा जो चौकशी कचेरींत असतो तेथें ती चिठ्ठी टाकलेली असते. फलाणा नांवाचा प्रवासी या संस्थेंत राहतो किंवा नाहीं व रहात असल्यास कोणत्या मजल्यावर आणि कोणत्या नंबरच्या खोलींत रहातो याची माहिती एका मिनिटाच्या आंत आपल्याला या ऑफिसमध्यें मिळते.

न्यूयॉर्क शहराचे चार मोठे विभाग आहेत. मॅनेहटन, ब्राँकस्, ब्रुकलीन व क्वीनस्. या सर्वांत मॅनेहटन हा भाग फार दाट वस्तीचा आहे. एका बाजूला ॲटलाँटिक महासागर आणि दुसऱ्या बाजूला हडसन नदी आहे. या दूरवर पसरलेल्या शहरांत दोन प्रकारचीं वाहनें आहेत. एक पृष्ठभागावरचीं व दुसरीं जमिनीखालून जाणारी वाहनें. नदी खालून जाणारे विजेनें प्रकाशित असे मोटारीकरितां व आगगाडीकरितां अनेक

रस्ते आहेत. इंग्लंडमध्यें जशा टयूब रेल्वे आहेत तशा भूगर्भातून जाणाऱ्या आणि विजेनें चालणाऱ्या आगगाड्या या ठिकाणीं आहेत. या आगगाड्यांचें जाळें सर्व न्यूयॉर्कभर पसरलेलें आहे.

रस्त्यांचीं बहुतेक नांवें संख्यावाचक असतात. मोठ्या रस्त्यांना ॲव्हेन्यू म्हणतात. उदा० पांचवा ॲव्हेन्यू वगैरे. रस्त्यांचे अनेक चौक झालेले आहेत व इमारती एकेका चौकटींत बसविल्या आहेत, त्यामुळें आणखी एक मोठी सोय झाली. शहराचा नकाशा आपल्याजवळ असला म्हणजे कोणालाहि न विचारतां आपल्याला इच्छित स्थळीं जातां येतें. रस्त्याच्या प्रत्येक चौकाच्या चार कोपऱ्यांवर त्या त्या रस्त्यांच्या नंबरचे खांब असतात. विशिष्ट नंबरच्या रस्त्यावरून जाणाऱ्या बसेस्‌करितां एकच दर असतो.

बसड्रायव्हर हाच कंडक्टरचें काम करतो. ड्रायव्हरच्या शेजारीच दरवाजा असतो. हा दरवाजा उघडणें व बंद करणें हें ड्रायव्हरजवळ असलेल्या किल्लीवर अवलंबून असतें. या दरवाज्याच्या मध्यभागीं जाड अशी पोलादी सळई असते. एका भागांतून आंत यावयाचें व दुसऱ्या भागांतून बाहेर जावयाचें. ड्रायव्हरच्या शेजारीं लहान अशी कांचेची पेटी असते. आंत गेल्यावर ठरलेल्या दराचे पैसे पेटींत टाकावयाचे. आपण पेटींत पैसे टाकले कीं नाहीं इतकेंच ड्रायव्हर पाहतो. सर्वच लोक शिस्तीनें वागत असल्यामुळें बसमध्यें चढण्यास सोयीचें जातें.

भूगर्भांतील विजेच्या आगगाडींतून प्रवास करण्याचा हाच माझा पहिला प्रसंग. शेंकडों लोक भुयारांत उतरतात व बाहेर येतात. सुमारें पन्नास पायऱ्या उतरून मी आंत गेलों. चोहोंकडे विजेचा लखलखाट. लोकांची तोबा गर्दी. स्टेशनवर, न स्टेशनमास्तर, न कोचिंग क्लार्क, न तिकीट तपासणारे, कोणीहि आढळलें नाहीं मला. येथें प्रत्येक गोष्ट यंत्राच्या सहाय्यानें केली जाते. प्लॅटफार्मला तिकडे ट्रॅक म्हणतात. ट्रॅकवर जाणाऱ्यास कित्येक फिरते दरवाजे आहेत, तर बाहेर येणाऱ्या लोकांसाठीं निराळे स्प्रिंग्जचे दरवाजे आहेत. आंत जाणाऱ्या प्रत्येक

फिरत्या दरवाजावर एक लहानसें चौकोनीं भोंक असतें. या भोंकांतून 'डाइम्' नांवाचें एक पावलीयेवढें चांदीचें नाणें टाकल्यावर हा दरवाजा उघडतो. जाणाऱ्या व येणाऱ्या गाडीचे ट्रॅक्स निराळे आहेत. याशिवाय कित्येक स्टेशनवर चार चार ट्रॅक्स आहेत. एका ट्रॅकवरून दुसऱ्या ट्रॅकवर जाण्यास रुळाखालून रस्ते असतात. कांहीं ठिकाणीं भूगर्भातून जाणाऱ्या लोहमार्गाखालती दुसराहि लोहमार्ग असतो. आपल्याला कोणत्या ट्रॅकवर जावयाचें व भूगर्भातील कोणत्या मजल्यावर आपली गाडी यावयाची हें अनुभवाशिवाय कळणें कठिण आहे.

भूगर्भातील स्टेशनें भूपृष्ठावरील महत्त्वाच्या वस्तीप्रमाणें लहान-मोठीं असतात. तर कांहीं स्टेशनें ५० फूट खोल तर कांहीं ५०० फूट खोल असतात. अशा स्टेशनवर जाण्यासाठीं एस्क्यलेटरस् असतात. ज्याला आपण मराठींत फिरते जिने म्हणूं. पहिल्या पहिल्यानें यावरून जाण्यास भीति वाटते. मोठमोठ्या स्टेशनवर पोस्ट ऑफिस, अनेक प्रकारचीं दुकानें व रिस्टॉरंटस् असतात. आपलीं वजन घेणारीं यंत्रें, चाकोलेट देणाऱ्या यांत्रिक पेट्या, सोडावाटरच्या बाटल्या देणारे यांत्रिक खांब, भाजलेले व मीठ लोणी लावलेले काजूचे गोलाकृति कांचेचें यांत्रिक भांडें, बुटाला पॉलिश करणाऱ्या यांत्रिक पेट्या. येथून तेथून सर्व यांत्रिक, फक्त माणूसच तेवढा नैसर्गिक. त्या त्या यंत्रांत येथें लिहिलेल्या किंमतीचें नाणें टाकल्यावर आपल्याला इच्छित वस्तु मिळते.

पांच पांच मिनिटांनीं गाड्या येतात. अंधारांतून गाडी येत असतांना गाडीच्या इंजिनवरचा विजेनें प्रकाशित केलेला नंबर आपल्याला दिसतो. गाडी स्टेशनवर एका मिनिटापेक्षां जास्त वेळ थांबत नाहीं. गाडी उभी राहतांच प्रत्येक डब्याचे दरवाजे आपोआप उघडतात व नंतर बंद होतात. एका डब्यांतून दुसऱ्या डब्यांत जाण्यास मधें दरवाजे असतात. बसण्यासाठीं प्रत्येक डब्यांत वेतानें विणलेलें स्प्रिंगचे लांबच्या लांब खुर्चीवजा बाक असतात. स्टेनलेस् स्टीलचे आडवे दांडे त्याला असतात. प्रत्येक डब्यांत भूगर्भातून जाणाऱ्या लोहमार्गाचे मोठमोठे नकाशे

पाहून तर आपण निराळ्याच जगांत आलों असें वाटतें. स्त्री व पुरुष हा भेदाभेद येथें कोठेंच आढळत नाहीं. गर्दींत एकमेकास धक्का लागल्यास कोणीच मनावर घेत नाहींत. कित्येक वेळा माफ करा यावर काम भागतें. गाडीचा वेग ताशीं सुमारें ६० मैल असतो. गाडींत, स्टेशनवर वा बोगद्यांत झुळझुळ वारा वाहण्याची सोय असते. 'नो स्मोकिंग'ची पाटी सर्व ठिकाणीं आढळते. या नियमाचें उल्लंघन कोणीहि करीत नाहीं. एक 'डाइम' नाणें टाकून आपण ट्रॅकवर गेलों म्हणजे कोणत्याहि गाडींत बसून कितीहि वेळ प्रवास केला तरी कोणी विचारीत नाहीं. या भूगर्भांत जेव्हां जेव्हां मी रस्ते चुकत असे व भांबावून जात असे, त्यावेळेस कित्येक स्त्री-पुरुषांनीं मला मार्गदर्शन केलें इतकेंच नव्हे तर मला ज्या ठिकाणीं जावयाचें असे तेथपर्यंत ते स्वतः मला पोंहचविण्यास येत व हें काम केवळ आभारप्रदर्शनावर भागत असे.

अमेरिकेंतील नागरिक आपल्या नागरिकत्वाचें रक्षण डोळ्यांत तेल घालून कसें करतात याचा अनुभव मला अनेक वेळां आला. एका अमेरिकन बाईनें मला व माझे नुकतेच झालेले स्नेही एक बेल्जियमचे डॉक्टर यांना भोजनाचें निमंत्रण दिलें. त्या बाईच्या घरीं जाण्यासाठीं आम्हांला भूगर्भ रेल्वेंतून प्रवास करावयाचा होता. आम्ही गर्दींत घुसलों. दरवाजाजवळ आलों. 'डाईम' टाकण्याच्या तयारींतच होतों आम्ही, पण त्या इतक्या गर्दींत बाहेर पडणाऱ्या दरवाज्यांतूनच आम्ही आंत गेलों व गाडींत जाऊन बसलों. विनामूल्य प्रवास करून आम्ही तिच्या घरीं गेलों. गप्पा मारीत जेवत असतां आम्ही सहज म्हणालों 'आज आम्ही प्रवासांत एक 'डाईम' नाणें वांचविलें.'

ताबडतोब ती बाई म्हणाली— 'तुम्ही परदेशांतील माणसांनीं न्यूयॉर्कला दोन डाईमनें गरीब केलें'. परत जातांना आम्ही दोन डाईम जास्त टाकूं असें तिला आश्वासन दिलें तेव्हां तिचें समाधान झालें.

# प्रकरण ९ वें

भूगर्भरेलमधून प्रवास करण्याचें मला अंगवळणीं पडून गेलें. हा शहराखालचा प्रवास अत्यंत स्वस्ताचा व जलद गतीचा आहे. खालून वर आल्यावर आपले डोळे सूर्यप्रकाशानें किलकिले होतात, व आपण कोणत्या ठिकाणीं पृष्ठभागावर आलों याचा ठावठिकाणा लावण्यांत जरा वेळ जातो.

शहराच्या ज्या भागांत भूगर्भरेल्वे नाहींत, त्या भागांतून जाण्यास बस सर्व्हिस अथवा भाड्याच्या मोटारी मिळतात. भाड्याच्या मोटारींना इकडे कॅब म्हणतात. या कॅबचा रंग साधारणतः पिवळा असा ठरलेला असतो. या मोटारीसुद्धां रोल्स रॉयसप्रमाणें बिन आवाजाच्या व ऐषारामाच्या असतात. या मोटारींना भाड्याकरितां बोलावण्याच्या दोन पद्धति आहेत. आपल्या खोलींत बसूनच कोणत्या तरी कॅब कंपनीला आपला पत्ता देऊन फोन करावा म्हणजे पांच मिनिटांत गाडी आपल्या दारांत येऊन उभी राहते. दुसरी पद्धत जवळच्या चौकांत एक दोन मिनिटें उभे राहिल्यास एखादी रिकामी यलोकॅब जातांना आपल्याला दिसते. 'कॅब' म्हणून हांक मारतांच आपण उभे राहिलेल्या फुटपाथ जवळ गाडी येते. आगाऊ भाडें ठरविण्याची भानगड नाहीं. दार उघडून आपण आंत बसतांच ड्रायव्हर कोठें जावयाचें असें विचारतो. मोटार चालू झाल्यावर मोटारींत असलेला रेडिओ तो चालू करतो. रस्त्यांतून जातां जातां आपल्याला गाणीं व बातम्या ऐकूं येतात. त्याचप्रमाणें कोणत्या भागांतून मोटार जात आहे, गिऱ्हाइक कोठें जाणार आहे, रस्त्यावरलि गर्दी व घडलेल्या अपघाताची माहिती ड्रायव्हर आपल्या कंपनीला मोटारींत बसविलेल्या 'माइक' वरून देत असतो. आपल्यासमोर वेळ दर्शविणारें घड्याळ, वेग दर्शविणारें यंत्र, पांच पांच मिनिटांच्या अंतरानें आपलें भाडें दाखविणारें यंत्र बसविलेलें असतें. ड्रायव्हर हा नम्र व नेहमींच मदत करण्यास तयार असतो.

मोटारींत सामान ठेवणें व काढणें हें सर्वच तो करतो. आमच्यासारखा परदेशाचा माणूस भेटल्यावर तो निरनिराळे प्रश्न विचारून भंडावून सोडतो. परदेशाची माहिती ऐकण्यासाठीं तो फार उत्सुक असतो. स्थानीय बातम्यांची इत्थंभूत हकीगत त्याला माहीत असते.

एकदां न्यूयॉर्कच्या एका भागांत एका ड्रेनेजचें तोंड अकस्मात् उघडें राहिल्यामुळें एक आठ वर्षांचें मूल आंत पडलें. वर्तमानपत्रकारांनीं हलकल्लोळ माजविला. फायरब्रिगेड, ॲम्ब्युलन्स व पोलीस यांची धांवपळ सुरू झाली. मी याच दिवशीं कांहीं कामाकरितां दोन तीनदां भाड्याची मोटार केली. आंत बसल्यावर ड्रायव्हरनें पहिला प्रश्न केला मला, ती मुलगी सापडली का ?' दोन दिवस झाले, आतां काय करावें ?' जणुं काय आपलीच मुलगी गेली याप्रमाणें तो चिन्ताक्रान्त होता.

ड्रायव्हरला यंत्रानें दाखविलेल्या दराचे पैसे आपण देतोंच, पण याशिवाय त्याला बक्षिस देण्याचा इकडे रिवाज आहे. झालेल्या दराच्या एक अष्टमांश रक्कम साधारणतः देतात. अमेरिकेंत गाड्या उजव्या बाजूनें जातात. चौकांतील मोटारींची रहदारी मध्यभागीं असलेल्या हिरव्या व लाल दिव्यावर अवलंबून असल्यामुळें पोलीस हातानें खुणा करण्यास कोठेंच नसतो. या यंत्रानें दिलेल्या मार्गदर्शनाचें उल्लंघन कोणीच करीत नाहींत.

हिंदी विद्यार्थी हा मध्यम स्थितींतला असला तरी मोटार ठेवूं शकतो. जुनी पण दुरुस्त केलेली गाडी ६०० रु. पर्यंत सहज मिळते. येथें पेट्रोल फारच स्वस्त म्हणजे १२ आण्याला गॅलन मिळतें. अशाच एका हिंदी मित्राच्या गाडींत बसून आम्ही न्यूयॉर्क शहरांत आपल्या फुरसतीच्या वेळीं भटकत असूं. माझ्या मित्राची एक कॉलेज मैत्रीण होती. मैत्रिणी-बरोबर फिरावयास जाणें, फराळ करणें, नृत्य करणें या गोष्टी आवश्यक नाहींत पण समाजजीवनाला पोषक आहेत असें समजलें जातें. पुष्कळ वेळेस आम्ही मिळून फिरावयास जात असूं. मध्येंच ती तरुणी मोटार हांक-

ण्यास बसला म्हणजे माझा पांचावर धारण बसे. मोटार खूप वेगांत सोडणें, चुकीच्या बाजूनें नेणें, एकदम ब्रेक दाबणें या तिच्या नेहमींच्याच गोष्टी. परंतु तिला बोलण्याची सोय नाहीं व मला तर असे प्रसंग टाळतां येणें अशक्य, त्याला कारण माझ्या हिंदी मित्राचा प्रेमळपणा व सरळ वागणूक.

एकदां आम्ही रात्रीं हडसन नदीच्या जगप्रसिद्ध वॉशिंग्टन पुलावरून न्यूजर्सीला गेलों. तेथें पॅलिसेड नांवाची विस्तीर्ण बाग आहे. या बागेंतील मोकळ्या मदानावर फिरते पाळणे, फिरतीं चक्रें, एक हजार फुटांवरून एकदम खालीं येणाऱ्या लहान गाड्या होत्या. आपल्याकडे जत्रेंत लहान मुलें लाकडी घोड्यावर बसून चक्रावर फिरविलीं जातात व गति एक माणूस हातानेंच देत असतो. या लाकडी घोड्याला असलेली दांडी फार तर तीन चार फूट असते, पण तिकडे या सळयाऐवजीं वीस फूट लांबीच्या साखळीच्या शेवटीं या घोड्याची बैठक असते. विजेच्या मदतीनें हे चक्र इतकें वेगांत फिरतें कीं, हे साखळदंड मध्यभागीं छतासारख्या फिरत असलेल्या फ्रेमच्या समपाताळींत येतात. धाडसी वृत्ति अमेरिकन तरुणांत यावी म्हणून अशीं खेळाचीं यंत्रें बसविलीं आहेत. मीं अशा एका खेळाच्या यंत्रांत बसून मुद्दाम अनुभव घेतला. माझ्या हिंदी मित्रानें असा अनुभव घेऊं नका म्हणून मला आग्रहपूर्वक विनंती केली. कारण हिंदी लोकांना याची गति सहन होणें कठीण असतें. याचा अनुभव मला लवकरच आला. आंतडीं, फुप्फुस व मेंदू शरीराबाहेर पडतात कीं काय असें मला वाटलें.

---

# प्रकरण १० वें

विद्युद्वेगानें अत्यंत गतिमान झालेल्या एका खेळाच्या खुर्चीवर बसून जो धाडसी अनुभव मीं घेतला तो कधींच विसरणें शक्य नाहीं. या पार्कमध्यें अशा प्रकारचीं पंचवीस यंत्रें बसविलीं होतीं. हस्तरेषा पाहून भविष्य वर्तविणारे स्त्री–पुरुष येथें दुकान मांडून बसले होते. हस्ताक्षर पाहून स्वभावपरीक्षण करणारे तज्ज्ञ बसले होते. दुसऱ्या बाजूला भविष्य व स्वभावपरीक्षण झाल्याबरोबर सर्व हकीगत टाईप करून एका पाकिटांत बंद करून आपल्याला मिळतें. अशा खेळाची व करमणुकीची व्यवस्था सृष्टिसौंदर्यानें नटलेल्या नदीकांठीं किंवा समुद्र-किनारीं असलेल्या बागेंत कायमची करून ठेविलेली असते. संध्याकाळीं येथें नेहमींचीच गर्दी. विशेषतः रविवारीं जास्त असते.

रविवार हा पूर्ण विश्रान्तीचा दिवस. न्यूयॉर्कमध्यें कचेऱ्या शनिवारीं एक वाजतांच सुटतात. 'विक–एन्ड' आठवड्याचे शेवटचे दिवस एखाद्या खेडेगांवांत, रम्य उपवनांत अथवा शहरापासून फार दूर अशा निसर्गरमणीय एकान्त स्थळीं घालविण्याची येथें सर्वसाधारण रीत आहे. अशा सहलींत पतिपत्नी हे आपला परिवार घेऊन जातात. तरुण-तरुणी आपल्या आयुष्यांतील भावी जोडीदार या सहलींतच मिळवितात. एखादा एकान्तप्रिय शास्त्रज्ञ अथवा राजकारणधुरंधर मुत्सद्दी या दिवशीं पूर्ण विश्रान्ति घेऊन पुनः नव्या जोमानें काम सुरूं करतात. विक-एण्डच्या माझ्या सहली कधीं एखाद्या कुटुंबाबरोबर तर कधीं देखावे पहा-ण्यास निघालेल्या सार्वजनिक व सामुदायिक मंडळाबरोबर होत असत. अशीं मंडळें न्यूयॉर्क शहरांत अनेक ठिकाणीं आहेत. मी कित्येक दिवस वाय्. एम्. सी. ए. च्या हॉटेलमध्यें राहिलों होतों, तेथें सुद्धां अशी व्यवस्था होती. रविवारीं निघणाऱ्या सहलीच्या कार्यक्रमाच्या छापील पत्रिका आपण राहात असलेल्या खोलींत दोन दिवस अगोदरच टाक-ण्यांत येते. सहलीला निघण्याची व परत येण्याची वेळ, सहलींत मार्ग-

दर्शन करणाराचें नांव, येणारा खर्च वगैरे माहिती पत्रिकेंत छापलेली असते. दर रविवारीं बायबल ब्रेकफास्ट अथवा इंटरनॅशनल क्रासरोडस् हे कार्यक्रम व्हायचेच. यांत भाग घेणें वा न घेणें हें आपल्यावर अवलंबून असतें. बायबल ब्रेकफास्टचें तिकीट पन्नास सेंटसूचें असतें. याला दोनशें एक मंडळी हजर असतात. प्रथमतः सर्वांनीं उभे राहून प्रार्थना करावयाची. एका छापील कार्डावर ही छापलेली प्रार्थना सर्वांनाच दिली जाते. यानंतर उपाहाराचा कार्यक्रम होतो. त्यांत कॉफी, टोस्ट, मांस, अंडीं वगैरे पदार्थ असतात. याच वेळीं प्रत्येकानें ( अर्थात् नवीन आलेल्या गृहस्थानें )—उभे राहून स्वतःची ओळख करून द्यावयाची. ती माहिती ऐकल्याबरोबर सभेचे संचालक व इतर टाळ्यांच्या गजरांत आपलें स्वागत करतात. सर्वांत शेवटीं संचालकाचें स्वागतपर भाषण होतें. यानंतर आन्तरराष्ट्रीय प्रसिद्ध अशा एखाद्या व्यक्तीचें भाषण एक तासभर होतें. साधारणतः या भाषणाचे विषय जागतिक शांतता, विश्वबंधुत्व, ख्रिश्चन तत्त्वप्रणालीचा अतिपूर्व देशांत प्रसार वगैरे असत. भाषण संपल्यावर आपल्या शंका आपण विचारूं शकतों. या कार्यक्रमानंतर चर्चमध्यें आम्ही प्रार्थनेला जात असूं. चौघे किंवा आठ आठ जणांच्या समूहांनीं आंत जाण्याची शिस्त असते. सर्वांत हडसन नदीच्या कांठीं असलेले रिव्हरसाईड चर्च मला पसंत होतें. तेथील सभोंवतालचा देखावा पाहून मन अगदीं प्रसन्न होत असे. या चर्चमध्यें एका वेळेस सुमारें तीन हजार स्त्री-पुरुष बसतील इतक्या खुर्च्या होत्या. प्रत्येक खुर्चीला एक पिशवी असते. त्यांत बायबलचें पुस्तक व संगीत शास्त्राच्या नोटेशन्सहित स्तोत्राचें पुस्तक असतें. समोरच्या व्यासपीठावर प्रार्थना चालविणारे अनेक स्त्री-पुरुष एकाच रंगाच्या पोशाखांत उभे असतात. स्तोत्र कोणतें म्हणावयाचें हें मुख्य पाद्रीनें सांगितल्यावर सर्वांनीं उभे राहून पियानोवर स्तोत्रें म्हणावयाचीं. हा संगीत सूर मला बिलकूल येत नसल्यामुळें व शेजारीं उभे असलेल्या स्त्रीपुरुषांना माझ्या अज्ञानाची जाणीव होऊं नये म्हणून मी बतावणी करीत असें. या

प्रार्थनेनंतर पाद्री व्यासपीठावर ठेवलेल्या उच्चासनावर उभे राहून धर्मोपदेशास सुरुवात करी. उपदेशानंतर कांहीं गोंगाट न होतां लोक अगदीं शिस्तीनें बाहेर पडत.

एका रविवारीं सकाळीं मी सहज बाहेर फिरावयास पडलों. फुटपाथवरून जातां जातां 'सण्डे सर्व्हिस' ची पाटी मीं पाहिली. मीं आंत गेलों. सुमारें पन्नास स्त्री-पुरुष धर्मोपदेश ऐकण्यांत तल्लीन झालेले मीं पाहिले. मीहि हळूंच एका खुर्चीवर बसलों. 'येशू हा सर्वांचा तारक आहे. येथें असा कोणी आहे कां कीं जो येशूला मानीत नाहीं? असा येथें कोणी पापी आहे का जो येशूच्या उपदेशाप्रमाणें वागत नाहीं? त्यांनीं सभेंतून निघून जावें" वगैरे उपदेश तेथें उपदेशक करीत होता. अशा अपरिचित ठिकाणीं आल्याबद्दल मला पश्चात्ताप झाला. मी हें सर्व ऐकून गप्पच बसलों. सभा विसर्जन पावल्यावर नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें आपआपसांत ओळख करून घेण्याची वेळ आली. मुख्य उपदेशक माझ्याजवळ येऊन म्हणाले— 'आपण कोठले व कोणत्या धर्माचे?'

"मी हिंदुस्थानी नागरिक आहें."

"तुम्ही ख्रिश्चन आहात का?"

"मी येशूला माझ्या आयुष्याचा मार्गदर्शक समजतों. पण तुम्ही समजतां त्याप्रमाणें मी ख्रिश्चन नाहीं."

"तुम्ही जर ख्रिश्चन झाला नाहींत तर तुमच्या पापाची जबाबदारी कोण घेईल?"

मी म्हणालों—"हें पहा, माझा पूर्वेतिहास तुम्हांला कांहींच माहीत नसतां अशा सुधारलेल्या आधुनिक काळांत अशा तऱ्हेचीं बोलणीं तुम्हाला शोभत नाहींत."

माझें बोलणें ऐकून ते गृहस्थ बरेच रागावलेले दिसले मला. तितक्यांत बरीच मंडळी माझ्याभोंवतींहि जमली. कांहीं तरी बहाणा करून अशा बिकट व विचित्र परिस्थितींतून मी पसार झालों.

---

# प्रकरण ११ वें

न्यूयॉर्क शहरांत पार्क ॲव्हेन्यूवर अमेरिकन बायबल सोसायटी आहे. एका रविवारीं या रस्त्याच्या फुटपाथवरून जात असतांना मोठमोठ्या कांचेच्या शोरूमसमध्यें जगांतील निरनिराळ्या भाषेमध्यें छापलेल्या बायबलच्या प्रती पाहिल्या. हे ग्रंथ मोठ्या टाईपांत छापलेले व प्रत्येक ग्रंथाचें मधलें पान उघडें करून त्या त्या भाषेच्या लिपीचें प्रदर्शन केलें होतें. मराठी भाषेंत लहान-मोठ्या टाईपांत छापलेल्या अनेक प्रती येथें पहाण्यांत आल्या. आंधळ्याकरितां ब्रेल लिपींमध्यें छापलेलें बायबल दिसलें. या ब्रेललिपींत सुद्धां जगांतील पुष्कळ भाषांचा समावेश आहे. महाराष्ट्रीय अंधांकरितां मराठी ब्रेल लिपींत लिहिलेलें बायबल पाहिलें. अशा या बायबलच्या प्रदर्शनीय खोल्या रस्त्याच्या कडेला जवळ जवळ एक फर्लांगपर्यंत आहेत. ही इमारत किती उंच आहे म्हणून मीं वर पाहिलें, तों इतके मजले दिसले मला कीं, मीं ते मोजण्याचें अजिबात सोडूनच दिलें. रविवारीं सोसायटी बंद असल्यामुळें मी दुसऱ्या दिवशीं पुनः या भागांत आलों. पहिल्यानें व्यवस्थापकाकडून थोडीशी माहिती मिळविली. जगांतील निरनिराळ्या भाषा जाणणारे अनेक तज्ज्ञ या संस्थेंत काम करितात. १९४८ अखेरपर्यंत एक हजार नव्वद भाषेंत बायबल ग्रंथ या संस्थेनें छापून प्रसिद्ध केले आहेत. या संस्थेचा वार्षिक खर्च ४० लक्ष डॉलर्स आहे. या संस्थेनें छापलेल्या बायबलच्या ग्रंथांची किंमत फारच कमी. ते पुष्कळ ठिकाणीं विनामूल्य पाठविण्यांत येतात.

जगांतील अंध लोकांकरितां या संस्थेनें बजावलेली कामगिरी स्पृहणीय आहे. या शाखेची जनरल सेक्रेटरी मिस रुथ बॅरेट नांवाची एक वृद्ध स्त्री आहे. तिनें मला सुमारें तीन तास मुलाखत दिली. अंधांची ब्रेल लिपी ही जाड कागदावर उभारलेलीं अक्षरें असल्यामुळें शाईनें छापलेल्या ग्रंथापेक्षां ब्रेल लिपीचा ग्रंथ आकारानें व विस्तारानें फार

मोठा असतो. मराठी ब्रेल लिपीची माहिती मीं तिला विचारली. भारत सरकार आतां भारताच्या सर्व भाषांकरितां भारती ब्रेल लवकरच प्रसिद्ध करणार आहे असें मीं तिला सांगितलें. ही भारती ब्रेल पद्धति भारताच्या सर्व अंधशाळेंत सुरू झाल्यावर आतांपर्यंत छापलेले बायबलचे ब्रेल ग्रंथ भारताला उपयोगी पडणार नाहींत. भारती ब्रेलची रूपरेखा मीं तिला सांगितली. भारत सरकारनें ही पद्धति प्रसिद्ध केल्यानंतर बायबल ग्रंथ या नवीन ब्रेल लिपींत आम्ही छापूं असें तिनें सांगितलें. हैद्राबादच्या अंधशाळेकरितां इंग्रजी भाषेंतील इंग्लिश ब्रेल पद्धतींत छापलेल्या वीस प्रती तिनें देणगी म्हणून मला दिल्या. तिनें संस्थेच्या खर्चानें या वीस प्रती हैद्राबादला पाठविल्या. जगांतील निरनिराळया भाषेंत ब्रेल पद्धतींत बायबल वाचीत बसलेल्या आंधळयांचे हजारों फोटो अत्यंत आकर्षक व भव्य आकारांत छापलेले आणि फ्रेम करून येथें ठेविलेले आहेत. बायबलच्या शिकवणुकीचा प्रसार करण्याकरितां या संस्थेचा पराकाष्ठेचा प्रयत्न चालूं आहे. अमेरिकेंत डॉलर म्हणजे देव असें आपण समजतों. संपत्तीशिवाय अमेरिकेंत आपल्याला कांहीं दिसत नाहीं, पण तेथेंहि धर्मग्रंथांचा अभ्यास शहरापासून तों खेडेगांवापर्यंत करण्यांत येतो. यावरून येथेंहि ईश्वराला स्थान आहे असें वाटल्यावांचून रहात नाहीं. वर्षानुवर्ष या संस्थेचा कसा उत्कर्ष होत गेला याचे अहवालाचे मोठमोठे ग्रंथ मला फुकट देण्यांत आले.

न्यूयॉर्कच्या मध्यवस्तींत जगप्रसिद्ध रॉकफेलर केंद्राच्या अनेक इमारती आहेत. मानव प्राण्यांच्या सुखसोयींकरतां येथें अनेक प्रकारच्या सोयी केलेल्या आहेत. पंचेचाळीस फूट उंचीचा व सोन्यासारखा चमकत असलेला ॲटलसचा पुतळा व या भव्य पुतळयाचे रेखीव स्नायुयुक्त शरीर पाहून आपल्याला आश्चर्य वाटतें. एका मोठ्या चौकोनी हौदांतील पाणी कृत्रिम रितीनें गोठवून पाण्याचा पृष्ठभाग कांचेप्रमाणें गुळगुळीत व घसरत्या शुभ्र बर्फानें आच्छादिलेला आहे. या बर्फावर शेंकडों नरनारी पायांत स्केटिंग पोलादी पादत्राणें घालून नृत्य करतात.

जगांतील सर्वांत मोठें नाटकगृह सिटी म्युझिक हॉल येथें आहे. या नाटकगृहांत एका वेळेस पांचशें नट रंगभूमीवर काम करतात. संध्याकाळीं या भागांतील फूटपाथ माणसांनीं फुलून गेलेले असतात. हीं माणसें जगांतील अत्यंत फॅशनेबल पोशाखानें व तिकडील संस्कृतीप्रमाणें नटलेलीं असतात. अशा ऐहिक वैभवाच्या शिखरावर असलेल्या या भागांतसुद्धां प्रार्थनामंदिरें आहेत. अशा एका चर्चमध्यें एके दिवशीं मी माझ्या अमेरिकन मित्र व मैत्रिणींबरोबर गेलों होतों. हें रोमन कॅथॉलिक पंथाचें प्रार्थनामंदिर होतें. येथें कुमारी माता मेरीपासून होऊन गेलेल्या ख्रिश्चन संतांचे संगमरवरी मानवाकृति पुतळे ठिकठिकाणीं बसविले आहेत. एका पुतळ्यासमोर पन्नास पन्नास मेणबत्त्या जळत असतात. ही सामुदायिक प्रार्थनेची वेळ नसल्यामुळें पुष्कळच खुर्च्या रिकाम्या होत्या. कांहीं स्त्री-पुरुष हातांत ‘होली-रोझरी’ पवित्र माळ घेऊन तोंडानें कांहींसें म्हणत इकडेतिकडे फिरत होते. प्रायश्चित्ताप्रीत्यर्थ मुख्य धर्मोपदेशकानें दिलेला हा एक मंत्र असतो असें नंतर मला कळलें. मीं हळूच एकापाशीं चौकशी केली, तेव्हां तो “ You are my Father तूं माझा पिता ” एवढाच जप करीत होता. संतांच्या मूर्तीला हात लावून आपल्या खांद्याला व मस्तकाला हात लावून घेण्याची इकडे पद्धत आहे. आपण पवित्र झालों ह्याचें हें चिन्ह आहे. ही झाली चर्चमधील गोष्ट. जेव्हां जेव्हां मी एखाद्या कुटुंबांत जेवावयास जाई त्यावेळेसहि जेवणाआधीं सार्वत्रिक प्रार्थना म्हणण्यांत येई. मीहि त्यानंतर संस्कृतमध्यें प्रार्थना म्हणत असें व त्याचें नंतर इंग्रजींत भाषांतर करून सांगे. इतकें या डॉलरच्या देशांत ईश्वराला प्राधान्य आहे.

---

# प्रकरण १२ वें

आज आम्ही न्यूयॉर्कमधील जगप्रसिद्ध स्वातंत्र्याच्या पुतळयाला भेट द्यावयाची ठरविली. आम्हांला सूचना मिळाल्याप्रमाणें आम्हीं १५–२० जण हॉटेलच्या लॉबीमध्यें दुपारीं एक वाजतां जमलों. आम्ही सर्वच दूरदूरच्या देशाचे होतों. यदृच्छया आम्ही सर्वच पुरुष होतों, परंतु आम्हाला मार्गदर्शन करणारी व्यक्ति कॉलेजमधील एक विद्यार्थिनी होती. सुट्टीच्या दिवशीं व फुरसतीच्या वेळीं काम करून पैसे मिळविणारे अनेक तरुण व तरुणी येथें आढळून येतात.

एक तासभर भूगर्भरेलमधून प्रवास केल्यानंतर वॉलस्ट्रीटच्या स्टेशन-वर आम्ही आलों. आकाशाला भिडणाऱ्या आणि अजस्र बांधणीच्या दगडी इमारतींची रांग रस्त्याच्या दोन्ही बाजूंला होती. येथें शेअर बाजार व बँका असल्यामुळें फूटपाथच्या बाजूला दुकानें नाहींत. इमारतीच्या उंचीच्या मानानें रस्ते अगदींच चिंचोळे वाटतात. या भागांत रस्त्यांना वळणेंहि जास्त आहेत. तो रविवारचा दिवस असल्यामुळें चोंहींकडे शुकशुकाट होता. आमची मार्गदर्शिकाही अत्यन्त जलद चालणारी व जातां जातां प्रत्येक इमारतीची माहिती व स्थळांचें ऐतिहासिक महत्त्व सांगणारी होती. एका गृहस्थाशीं तात्पुरती मैत्री करून व हातांत हात घालून मी तिच्या पाठोपाठ चालत होतों किंबहुना पळत होतों म्हटलें तरी चालेल. एखाद्या वेळेस आमची जोडी मागें राहिली व वळणामुळें पुढची मंडळी दृष्टीआड झाली म्हणजे आम्हांला भीति वाटत असे. अर्धा तास चालून गेल्यावर ॲटलांटिक महासागराच्या किनाऱ्यावर आम्ही आलों. न्यूयॉर्क बंदराचा हा एक भाग आहे. सागराच्या प्रचंड लाटा दगडी तटावर आदळत होत्या. स्वातंत्र्याचा पुतळा येथून दोन मैलांवर असलेल्या एका बेटावर असल्यामुळें आम्हाला एका जहाजामधून प्रवास करावयाचा होता. आमच्या मार्गदर्शिकेनें परतीचीं तिकिटें काढलीं. धक्क्यापासून बोटीपर्यंत असलेल्या तात्पुरत्या लाकडी पुलावरून आम्ही

जात असतांना बोटीच्या हेलकाव्यामुळें पूल हलत असे. या धक्क्यामुळें आम्ही कोलपडून पडूं नयें म्हणून बोटीचा नोकरवर्ग—वॉच युवर स्टेप—'जपून चाला' असें ओरडून सांगत असत. या दिवशीं या बोटींत सुमारें पांचशें स्त्री-पुरुष स्वातंत्र्याचा पुतळा पाहण्याकरितां चालले होते. या बोटीच्या डेकवर व खालीं आरामखुर्च्या व लहान लहान कॅनूव्हसच्या खुर्च्या पुष्कळ होत्या. घडीची खुर्ची घेऊन आपण कोठेंही जाऊन बसण्याची यांत सोय होती. या बोटीच्या मधल्या मजल्यावर एक दुकान होतें, कीं ज्यांत कॉफी, आइस्क्रीम, बिस्कीटस् वगैरे खाण्याचे जिन्नस अत्यंत स्वस्त दरांत मिळत. याशिवाय न्यूयॉर्क शहराच्या देखाव्याचीं चित्रें येथें विकत मिळत. बोटीवरील सहलीकरितां आलेल्या प्रणयी जोडप्यांच्या प्रणयी लीलांना ऊत आला होता. आपला प्रियकर व आपण याशिवाय त्या स्त्रियांचें लक्ष दुसरीकडे कोठेंहि जात नसे. आपल्यासारख्या एकाकी पुरुषानें या जोडप्याकडे बघणें असभ्य समजलें जात असे.

महासागरांतून तास दीड तासाच्या प्रवासानंतर आमची बोट बेडोला बटांत येऊन दाखल झाली. हें बेट फारच लहान म्हणजे एखाद्या फूटबॉल-



स्वातंत्र्याचा पुतळा व बेट बेडोला

ग्राऊंड इतकें असेल. येथेंच स्वातंत्र्याचा पुतळा आहे. हा प्रचंड पुतळा अमेरिकेच्या स्वातंत्र्याचें प्रतीक आहे. हा बारथोल्डी नांवाच्या फ्रेंच शिल्पकारानें फ्रान्समध्यें बनविला आहे व फ्रान्सनें सन १८८३ मध्यें अमेरिकेला हा पुतळा बक्षिस म्हणून दिला. याचा चबुतरा दीडशें फूट उंच असून चबुतऱ्यावर दीडशें फूट उंचीचा पुतळा उभा आहे. चबुतऱ्याचें क्षेत्रफळ ६२ चौरस फूट आहे. पुरातन काळच्या रोमन पद्धतीचें वस्त्र पुतळ्याभोंवतीं गुंडाळलेलें असून डाव्या हातांत ग्रंथ व उजवा हात वर करून स्वातंत्र्याची मशाल जळत आहे असें दाखविलें आहे. हा पुतळा आंतून भरीव नसल्यामुळें आम्हीं पायऱ्या चढून डोक्याच्या पोकळीपर्यंत गेलों. वर जाण्याकरितां लिफ्टचीही सोय आहे. डोक्याच्या पोकळींत चाळीस माणसें सहज उभीं राहूं शकतात. नंतर उजव्या हाताच्या पोकळींतून चढून मशालीपर्यंत आम्ही आलों. या मशालीच्या खालील गोलाकृति पोकळींत दहाबारा माणसें सहज मावूं शकतात. येथें असलेल्या भोंकांतून आम्ही न्यूयॉर्कचा देखावा पाहिला. येथें पुतळ्याच्या इतिहासाचें सचित्र व सुंदर पुस्तक विनामूल्य देण्यांत येतें. अर्धा तास डोक्याच्या पोकळींत आम्हीं विश्रांति घेतली. पुतळ्यामधून उतरण्याकरितां एक जिना, चढण्याकरितां दुसरा जिना व याशिवाय लिफ्ट आहे. डोक्यापर्यंत चढतांना आम्ही घामाघूम झालों. उतरतांना मात्र आम्ही पळत खालतीं आलों. चबुतऱ्याभोंवतीं हिरवळ आणि सुंदर बाग आहे. येथेंहि लहानसें उपाहारगृह आहे. मीं माझ्या कॅमेऱ्यानें बरेच फोटो घेतले. व्यवस्थित रीतीनें कापलेल्या व मखमलीसारख्या मऊ असलेल्या हिरवळीवर आम्हीं बराच वेळ लोळण घेऊन विश्रांति घेतली. येथेंहि जोडपीं हातपाय ताणून इतस्ततः पसरलेलीं दिसत होतीं. पानसुपारीच्या डब्याएवढे रेडिओ पुष्कळांच्या गळ्यांत अडकविलेले व गाणें ऐकत आणि महासागराच्या प्रचंड लाटा पहात फिरणारे अनेक स्त्री-पुरुष तेथें होते. एका तासानंतर आम्ही परत लिबर्टी बोटीनें न्यूयॉर्कला निघालों. यानंतर आम्हीं कांहीं चर्चेसना भेटी दिल्या. कांहीं चर्चेसच्या प्रांगणांत असलेलीं

थडगीं पाहिलीं. पुष्पमंडित लतागृहांनीं वेष्टित असलेल्या निरनिराळ्या आकाराच्या थडग्यांजवळ स्मृतिलेखांचे कोरीव दगड बसविलेले होते. हे लेख वाचून गतकालीन प्रसिद्ध स्त्री-पुरुषांची माहिती आम्हीं करून घेतली. याप्रमाणें आमच्या सहलीचा कार्यक्रम अत्यन्त मनोरंजक व माहितीपूर्ण झाला.

---

# प्रकरण १३ वें

एम्पायर स्टेट बिल्डिंग ही जगांतील सर्वांत उंच इमारत न्यूयॉर्क शहरांत आहे. ही इमारत आमच्या शेजारींच होती त्यामुळें ती नेहमींच माझ्या पाहण्यांत येत असे. या इमारतीची उंची एक हजार दोनशें पन्नास फूट आहे. या एकशें दोन मजली इमारतींत कित्येक बँका, दुकानें, रिस्टॉरंट, कंपन्या वगैरे हजारों संस्थांचा समावेश झालेला आहे. सुमारें एक लाख लोक येथें राहतात व काम करतात. वर व खालीं जाण्यासाठीं लिफ्टस् आहेत. यांची संख्या ६७ आहे. एका लिफ्टमध्यें वीस माणसें सहज उभीं राहूं शकतात. आपल्याला वरपर्यंत जावयाचें असल्यास दर दहाव्या मजल्यावर उतरून दुसरी लिफ्ट घ्यावी लागते. प्रथम जेव्हां मी येथें गेलों, तेव्हां लिफ्ट असलेल्या मोठ्या दिवाणखान्यांत लिफ्ट सांपडेना; लिफ्टचे दरवाजे व भिंत हा फरकच मला कळेना. भिंतींत बसविलेलें एक बटण दाबतांच जणू काय भिंत दुभंगून दरवाज्याचे दोन पट बाजूला होऊन आल्हादकारक प्रकाशानें प्रकाशित झालेली लिफ्ट आपल्यापुढें येते. विमानांत बसून वर जातांना जसा कानांत ठणका होतो त्याचप्रमाणें लिफ्टमधून जातांना ठणका जाणवतो.

या इमारतींत ६२ व्या मजल्यावर इंडियन डेलिगेशनची कचेरी आहे. सरकारी कामानिमित या कचेरींत मी जात असें. या मजल्यावर असलेल्या निरनिराळ्या देशांच्या डेलिगेशनसूच्या पाट्या आपण गॅलरीमधून जात

असतां आपल्या दृष्टीस पडतात. बारा नम्बरचा दरवाजा उघडल्यावर आपल्या देशाची कचेरी लागते. येथें काम करणारे कांहीं भारतीय स्त्री-पुरुष आहेत. याशिवाय अमेरिकन स्त्रियाहि भारतीय अधिकाऱ्यांच्या हाताखालीं सेक्रेटरी म्हणून काम करतात. आपल्या मायदेशचीं माणसें एकत्र येथें काम करीत असलेलीं पाहून आपल्याला या ऑफिसबद्दल आपलेपणा वाटतो. ही सर्व मंडळी माझ्यासारख्या नवख्याला सहानुभूति-पूर्वक मदत व मार्गदर्शन करण्यास तयार असतात.

याच इमारतींत ८२ व्या मजल्यावर एका भागांत शेठ डालमियाच्या मालकीचीं जितकीं वर्तमानपत्रें आहेत त्यांची एजन्सी व प्रतिनिधींची कचेरी आहे. या कचेरीनें माझी मुलाखत घेतली व माझ्या कामगिरी-बद्दलचा वृत्तांत वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केला.

याच बिल्डिंगमध्यें ८६ व १०२ नंबरच्या मजल्यावर वेधशाळा आहेत. येथें ग्रह व नक्षत्रांच्या निरीक्षणाकरितां यंत्रें व दुर्बिणी बसविल्या आहेत. ही इमारत न्यूयॉर्कच्या कुठल्याहि भागांतून दृष्टीस पडते. रात्रीच्या वेळेस खालपासून वरपर्यंतच्या हजारों खिडक्या विजेच्या दिव्यानें झगझगीत प्रकाशितात. हा मनोरम देखावा माझ्या राहत्या खोलीच्या खिडकींतून पलंगावर पडल्या पडल्या दिसत असे. कधीं कधीं रात्रीं एकदोनच्या सुमारास या भव्य इमारतीच्या पाठीमागें चांदण्या व चंद्रमाने प्रकाशिलेल्या निरभ्र आकाशाचा पडदा या इमारतीच्या शोभेंत भर घाली. कधीं आकाशांत ढग आल्यास या इमारतीचे वरचे मजले दिसेनासे होत. कधीं न्यूयॉर्कमध्यें पाऊस पडे तर या इमारतीचे वरचे मजले कोरडे ठणठणीत असत. तळघरापासून १०२ मजल्यापर्यंत पाहण्याकरितां प्रवेश-फी फक्त पांच रुपये. कांहीं कामानिमित्त आपण तेथें गेलों तर आपल्याला विनामूल्य आंत जातां येतें. ही प्रचंड इमारत बांधण्यास वीस कोटी रुपये खर्च आला.

जगांतील सर्वांत मोठी व चमत्कारिक वस्तु आपल्याजवळ असावी असें येथील लोकांना फार वाटतें. जगांतील सर्वांत मोठें दुकान मॅसी

आणि कंपनी माझ्या घरापासून दोन चौक ओलांडून गेल्यावर होतें. या २५ मजली इमारतीची लांबी व रुंदी एक फर्लांग असून दुकानच्या चारी बाजूंनीं रस्ते रुंद आहेत. मुलामुलींचे व स्त्री–पुरुषांचे तयार कपडे, फर्निचर, पुस्तकें, खेळणीं वगैरे भागांचा विस्तार फार प्रचंड आहे. आकर्षक रीतीनें सामान मांडण्याचें शास्त्र येथें पूर्णावस्थेला गेलें आहे. एका मजल्यावर मोटारी विकण्यास ठेवल्या आहेत. आपल्या पसंतीची मोटार विकत घेतल्यावर त्यांत बसूनच लिफ्टपर्यंत मोटार आणतां येते. लिफ्टचा दरवाजा उघडल्यावर आंतमध्यें मोटार न्यावी व रस्त्याच्या बाजूला लिफ्ट आल्यावर आपण ती घेऊन बाहेर पडूं शकतों. या दुकानाच्या तळघरांत कसर लागलेल्या किंवा खराब झालेल्या वस्तु विकण्यास ठेवल्या आहेत. या वस्तू अत्यन्त स्वस्त असल्यामुळें येथें फिरणारे गिऱ्हाईक मध्यमवर्गीय किंवा गरीब दिसतात. या तळघरांत ढिगाऱ्यानें जिनसा पडलेल्या असतात. प्रत्येक ढिगाऱ्याची किंमत तेथें पाटीवर लिहिलेली असते. येथील ग्रंथालयाच्या विभागांत भारतीय पुस्तकांची एक शाखा आहे. येथें विशेषतः महात्मा गांधींचीं व पं. नेहरूंचीं पुस्तकें प्रामुख्यानें दिसतात. नुकतेंच प्रसिद्ध झालेलें—'हाफ वे टू फ्रिडम' (Half way to Freedom) —हें पुस्तक मीं येथें विकत घेतलें. या दुकानाच्या मॅनेजरची मीं भेट घेतली. या दुकानांत दहा हजार विक्रेते आहेत व रोजची विक्री दहा लक्ष डॉलर आहे. विक्रेत्यांमध्यें स्त्रियांचा भरणा जास्त आहे. त्यांची नम्रता व गिऱ्हाइकांना खूष करण्याची ढब वाखाणण्यासारखी आहे. जिनसांच्या किंमतीबद्दल घासाघीस करणें येथें मुळींच दिसून येत नाहीं.

या दुकानाच्या बाजूला 'ऑटोमॅट' नांवाचें उपाहारगृह आहे. अशा प्रकारचीं उपाहारगृहें न्यूयॉर्क शहरांत अनेक ठिकाणीं आहेत. अशा उपाहारगृहांत यांत्रिक पद्धतीनें आपोआप खाद्यपदार्थ मिळण्याची सोय केलेली असते. एका मोठ्या हॉलमध्यें टेबल व खुर्च्या मांडलेल्या असतात. एका बाजूला ट्रेचा ढिगारा, काटे, चमचे व सुऱ्या असतात. पाणी पिण्याचे ग्लास, कप व बशा धुवून स्वच्छ ठेविलेल्या

असतात. ताक, दूध व कॉफी देणाऱ्या नळाजवळ एक एक चीर असते. त्या चिरींत तेथें लिहिलेल्या किंमतीचें नाणें टाकून नळाची तोटी फिरविल्यावर त्या किंमतीचें पेय आपल्या ग्लासांत किंवा कपांत पडून नळ आपोआप बंद होतो. खाण्याच्या वस्तु कांचेच्या लहान लहान कप्प्यांत ठेविलेल्या असतात. येथें असलेल्या चिरींतून तेथें पाटीवर लिहिलेली किंमत टाकतां क्षणींच दरवाजा उघडतो. बशींत ठेविलेलें खाद्य आपण बाहेर काढून घेतल्यावर नंतर दरवाजा बंद होतो. हें सर्व खाद्य व पेय ताजें असतें. तेथें एकही माणूस काम करण्यास नसतो. फक्त टेबलावरील वापरलेल्या कपबशा उचलण्यास नोकरवर्ग दिसतो.

---




## प्रकरण १४ वें

न्यूयॉर्क शहरांतील प्लॅनिटेरियम् ही यांत्रिक युगांतील एक आश्चर्यकारक इमारत आहे. प्लॅनेट म्हणजे ग्रह. ज्या गृहांत ग्रहमालिका व रात्रीं दिसणारे आकाशांतील देखावे दाखविले जातात, त्याला प्लॅनिटेरियम् म्हणतात. या वर्तुळाकार व घुमट असलेल्या इमारतींत सातशें माणसांना बसण्याइतकी गोलाकृति गॅलरी आहे. मध्यभागीं प्रचंड व गुंतागुंतीचें यंत्र एका फिरत्या चक्रावर घट्ट बसविलें आहे. याला प्रॉजेक्टर असें म्हणतात. प्रवेश फी तीन रुपये आहे. दिवसांतून चार, पांच वेळां प्रदर्शनाचें काम येथें होतें. एका रविवारीं दोन वाजतां चौघां मित्रांसह मी हें प्रदर्शन बघण्यास गेलों. या इमारतीच्या बाहेरच्या गॅलरींत मोठमोठीं चित्रें फ्रेम करून लावलीं आहेत. सूर्यावरील डाग, चंद्रावरील देखावे, मंगळादि ग्रहांचे हजारों पटीनें विस्तार करून दाखविलेलीं चित्रें येथें आहेत. वीसपंचवीस मैल उंचीवर असलेल्या वातावरणाचीं छायाचित्रें येथें आहेत. पृथ्वीवर पडलेल्या लहानमोठ्या उल्का येथें ओळीनें मांडून ठेवल्या आहेत. हें सर्व पाहिल्यावर आम्हीं घुमटाकार गृहांत प्रवेश केला. आम्ही परदेशांतून येथें ज्ञान संपादना-

करितां आलों आहोंत असें समजल्यावर तेथील व्यवस्थापकानें आमचें स्वागत केलें व गॅलरींतील पुढील जागा आम्हांस बसण्यास दिली. बारकाईनें आम्हीं प्रोजेक्टरचें निरीक्षण केलें. संधिप्रकाशाप्रमाणें आंतमध्यें विजेचा प्रकाश पडला होता. एकदम अंधार पडला. आम्ही वर पाहूं लागलों ता घुमटाच्या छताऐवजीं आम्हांला निरभ्र आकाश दिसलें. नक्षत्रें, ग्रह, आकाशगंगा वगैरे हुबेहुब चमकत आहेत असा आम्हांला भास झाला. पांचशें माणसें आमच्याभोंवतीं बसलेलीं पण सर्वत्र स्तब्धता. अंधार असल्यामुळें या कृत्रिम आकाशांतील दिव्य देखाव्यानें आम्ही भ्रमिष्ट झालों. येथें काम करीत असलेल्या एका खगोल शास्त्रज्ञानें आम्हांला माहिती दिली. आकाशांतील त्या त्या नक्षत्राचें व ग्रहाचें वर्णन चटकदार रीतीनें करीत असतांना काळसर रंगाच्या बाणाच्या अग्रभागानें वर्णित ग्रह व तारे दर्शविले जात. हळुहळू हा गडद अंधार नाहींसा झाला व क्षितिजावर बिंबाकार पूर्ण चंद्रमाचें दर्शन झालें. आकाशांतून चंद्राचें भ्रमण होत असतांना दिसत असलेल्या ग्रहादि नक्षत्रांचें वर्णन सांगण्यांत आलें. नंतर उषःकालचा देखावा दृष्टीस पडला. पूर्वेच्या बाजूला किंचित् सोनेरी वर्णाची झाक आहे, सूर्यनारायणाच्या आगमनाची वर्दी देण्याकरितां तेजःपुंज शुक्रादि चांदण्या पृथ्वीवर आपलें तेज फेकीत आहेत अन् सूर्याचें अर्धें बिंब क्षितिजावर दिसतें न दिसतें, तोंच हा एक तास चाललेला व भ्रमिष्ट करणारा कार्यक्रम समाप्त होतो. बाहेर येऊन पाहतों तों दुपारचे साडेतीन वाजलेले आमच्या दृष्टीला पडले.

'प्लॅनिटेरियम्'च्या शेजारीं रूझवेल्ट मेमोरियल म्युझियम आहे. वरवर नजर फेकीत जरी आपण हें पाहिलें तरी सात आठ दिवस लागतील. आमच्या सहा तासांच्या निरीक्षणामध्येंच आमचे डोळे शिणावले व पाय थकले. या ऐतिहासिक अजबखान्यांत पाषाणकालापासून आतां पर्यंत वापरण्यांत आलेलीं संहारक शस्त्रें, भांडीं, दागदागिने, वस्त्रें वगैरे लावदानाच्या खोलीमध्यें ठेवलेलीं होतीं. मानवाकृति पुतळ्यांना त्या त्या कालांतील व देशांतील दागिने घालून त्या दागिन्यांचें वर्णन आणि तें

मिळायचें ठिकाण छापून तें कार्ड तेथें अडकविलेलें होतें. महाराष्ट्रीय पद्धतीची नथ एका महाराष्ट्रीय स्त्रीच्या नाकांत आम्हीं पाहिली. डोक्याला घालीत असलेल्या शिरस्त्राणाच्या प्रदर्शनीय भागांत पुणेरी पगडीहि आम्हीं पाहिली. अनेक प्रकारचें ज्ञान संपादन करणारें हें एक स्वतंत्र वातावरणाचें विद्यापीठ आहे. हिंदुस्थानांत म्युझियम म्हणजे चमत्कारिक वस्तूंचा संग्रह समजला जातो आणि येथें फावल्या वेळीं येऊन धांवतें निरीक्षण करण्याची आम्हांला जणूं संवयच जडली आहे. परंतु अमेरिकेंत कित्येक विद्यार्थी व विद्यार्थिनी आपल्या आवडीप्रमाणें विशिष्ट कलेचा येथें वर्षानुवर्ष अभ्यास करीत असलेले आढळून येतात. शोधक बुद्धीच्या विद्यार्थ्यांना येथें सर्व प्रकारच्या सवलती देण्यांत येतात. येथें ज्ञानप्राप्तीचीं अनेक साधनें आहेत, त्यांत जगप्रसिद्ध कोलंबिया विद्यापीठाचा फार वरचा दर्जा लागतो. या विद्यापीठांत अंध व मूक शिक्षण पद्धतीचा अभ्यासक्रम पदवीधर शिक्षकांना ऐच्छिक विषय म्हणून घ्यावा लागतो. हा अभ्यासक्रम कोणत्या प्रकारचा आहे हें पाहण्याचें काम माझें असल्यामुळें मी अनेक वेळां त्या युनिव्हर्सिटींत जाई. येथें पस्तीस हजार विद्यार्थी वसतिगृहांत राहून विद्यापीठांत शिक्षण घेतात. यावरून या विद्यापीठाच्या इमारतींची कल्पना येईल. येथील ग्रंथालयांत पंधरा लक्ष ग्रंथ आहेत, येथें मुलामुलींना संमिश्र शिक्षण देण्यांत येतें. ज्ञात असलेल्या सर्व शास्त्र व कलांच्या अभ्यासाची सोय येथें आहे. येथील अभ्यासक्रमाचीं माहितीपत्रकें केंद्रीय कचेरींत ठेविलीं आहेत. आशियाई राष्ट्रांपैकीं चिनी संस्कृतीचा अभ्यास येथें मोठ्या प्रमाणांत होतो. मीं येथील चिनी ग्रंथांची लायब्ररी पाहिली. येथें चिनी विद्यार्थ्यांबरोबर अमेरिकन व युरोपियन विद्यार्थी चिनी ग्रंथांचा अभ्यास करीत असलेले मीं पाहिले. या विद्यापीठांत शंभर भारतीय विद्यार्थी असतील. याच कोलंबिया विद्यापीठानें पंडित नेहरूंना एल्‌एल्. डी. ची सन्माननीय पदवी बहाल केली आहे. या वेळचा येथील देखावा पाहून कोणत्याहि भारतवासीयाला अभिमान वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

---

# प्रकरण १५ वें

न्यूयॉर्कमधील मुख्य पोस्ट ऑफिस हें जगांतील सर्वांत मोठें पोस्ट ऑफीस समजलें जातें. तळघरासहित ही एकच मजली इमारत आहे. पण याचा विस्तार फारच मोठा आहे. याच्या चारी बाजूचे वाहतुकीचे रस्ते माणसांनीं फुलून गेलेले असतात. या पोस्ट ऑफीसचा दर्शनीय भाग रोमन पद्धतीचा आहे. सुमारें दोनशें यार्ड लांबीच्या रुंद रुंद वीस एक पायऱ्या चढून गेल्यावर पूर्ण कांचेचे दरवाजे लागतात. हे दरवाजे उंच व गोल अशा पंचवीस खांबांच्या मध्यभागीं बसविले आहे. आणि हे सर्वच दरवाजे स्प्रिंगचे असल्यामुळें नेहमींच लावलेले असतात. एकदां मी माझ्या हिंदी मित्राबरोबर पोस्ट ऑफीसच्या दर्शनी हॉलमध्यें उभा होतों. इतक्यांत एक अमेरिकन मनुष्य आपल्या मोटारींतून उतरून पायऱ्या चढला, परन्तु दरवाज्याचें तावदान फार स्वच्छ व अत्यन्त पारदर्शक असल्यामुळें त्यानें दरवाजाला धडक दिली. तावदान फुटून कांचेचे तुकडे चोहोंकडे पसरले आणि त्या माणसास गंभीर तऱ्हेच्या जखमा होऊन रक्तप्रवाह सुरूं झाला. वेळेला किंमत देणाऱ्या या अमेरिकन लोकांना या जखमी माणसास मदत करण्यास वेळ कोठें आहे ? माझ्या हिंदी मित्रानें ताबडतोब रुमाल काढून प्रथमोपचारास सुरुवात केली. मी थोडे घाबरतच माझ्या मित्राला म्हणालों— माझ्या अंगावर सुद्धां रक्ताचे शिंतोडे उडाले आहेत. पोलीस येऊन पंचनामा करतील व आपल्याला साक्ष द्यावी लागेल. कदाचित् त्याला ढकलून दिल्याचा आरोपही आपल्यावर येईल. आपण येथून जलद निघून जाऊं,—परन्तु माझा मित्र धीट होता. अमेरिकेंत चार पांच वर्षें काढलीं होतीं त्यानें. तो म्हणाला—‘ही अमेरिका आहे; हिंदुस्थान नव्हे.’ लगेंच तेथें रेडक्रॉस ॲम्बुलन्सची मोटार आली. त्या लोकांनीं त्या बेशुद्ध असलेल्या माणसास ताब्यांत घेतलें. रेडक्रॉसच्या माणसानें माझ्या स्नेह्याचा पत्ता विचारला. दुसऱ्या दिवशीं हिंदी माणसानें अमेरिकन माणसास कशी

मदत केली याचें अभिनंदनपर वृत्त वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालें. रेड-क्रॉसनें व्यक्तिशः अभिनंदनाचें पत्रहि त्याला पाठविलें.

जखमी माणसास उचलून नेल्यावर आरोग्यखात्याच्या लोकांनीं ती जागा स्वच्छ केली व दरवाजाची फुटलेली कांच परत बसविली. पंधरा मिनिटाच्या आंत जणु कांहीं तेथें कांहींच अपघात घडला नाहीं, अशी व्यवस्था करण्यांत आली.

कार्डें, पाकिटें व तिकिटें विकण्याकरितां येथें दहा खिडक्या आहेत. या हॉलमध्यें लोकांच्या सोयीकरितां लेखनसाहित्य ठेवलेलें आहे. कोणत्याहि खिडकीजवळ गर्दी असल्यास आपोआपच लोक एका ओळींत उभे राहतात. या पोस्ट ऑफीसचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे हें चोवीस तास उघडें असतें. दिवसभर काम करणारे लोक येथें येऊन रात्रीं बारा एक वाजतांहि मनिऑर्डर करूं शकतात. मी स्वतः हिंदुस्थानला पाठवावयाचें पार्सल केव्हांही करीत असे.

येथें एका कार्डाची किंमत एक सेंट आणि एका पाकिटाची किंमत तीन सेंट आहे. हिंदुस्थानला विमानानें पाकीट पाठवावयाचें असल्यास पंचवीस सेंटचें तिकीट लावावें लागतें. विमानानें पाठविलेलें पत्र न्यूयॉर्क-हून हैद्राबादला पांचव्या दिवशीं मिळतें तर जहाजानें येणारें पत्र दीड महिन्यानें मिळतें. न्यूयॉर्कच्या पोस्टांत रोज एकशेंवीस कोटी पत्रांची उलाढाल होते.

येथें तार करण्याची कंपनी निराळी आहे. त्याला 'वेस्टर्न युनियन' असें म्हणतात. या युनियनच्या शाखा जागोजाग आहेत. तार कर-ण्याच्या तीन पद्धती आहेत व त्यांचे दरही कमी-जास्त आहेत. मीं एकदां हैद्राबादला तार पाठविली. तार बारा तासानें मला परत मिळाली. विचारणा झाली कीं तार सिंध हैद्राबादला जावयाची कां दक्षिण हैद्राबादला? मी स्वतः पुनः तार ऑफीसमध्यें गेलों व म्हणालों, "हिंदुस्थानांत आतां हैद्राबाद एकच राहिलें आहे"—तेव्हा मला उत्तर मिळालें—जगाचा राजकीय नकाशा क्षणाक्षणानें बदलत आहे, त्यामुळें

दोन्हीही हैदराबाद आम्ही हिंदुस्थानांतच आहेत असें मानतों,– तारेवर दक्षिण हैदराबाद लिहिल्यावर पुनः कांहीं पैसे न घेतां ही तार स्वीकारण्यांत आली. तीनचार तासांत तार हिंदुस्थानांत सहज पोंहचते. तारखात्यानें अजून एक सोय केली आहे. अमेरिकेहून जेव्हां जेव्हां मी तार पाठवी, तेव्हां प्रत्येक वेळीं ती तार मुक्कामाला अमुक वेळीं पोंहचली म्हणून उलट तार अथवा टेलिफोन मला येई. यामुळें तार पोंहचली किंवा नाहीं याची काळजी करण्याचें कांहींच कारण उरत नसें.

---

## प्रकरण १६ वें

न्यूयॉर्क शहरांत ब्रॉडवे व सातव्या ऍव्हिन्यूला लागून असलेले ४२ पासून ५० नंबरच्या रस्त्यावर थिएटर व सिनेमाच्या रांगा लागल्या आहेत. दिवसभर श्रम केल्यावर रात्रींच्या करमणुकीकरितां येथें स्त्रीपुरुषांची अफाट गर्दी जमते. विजेच्या प्रकाशानें येथें रात्रीचा दिवस झालेला असतो. थिएटरमध्यें व रस्त्यावर अशा दोन्ही ठिकाणीं करमणुकीचीं साधनें अनेक आहेत. फूटपाथवर उभे राहून तासानुतास गंमत पाहणारे अनेक लोक दिसतात. कोणी आपल्या सहचरीच्या कंबरेला विळखा घालून उभा आहे, तर कोणी स्त्रीपुरुष एकमेकांच्या गळ्यांत हात घालून चालले आहेत, इतकेंच काय, आमच्या बरोबर एखादी मैत्रीण असल्यास तिला सुद्धां आपल्या सहवासाच्या प्रमाणांत वागविणें हें शिष्टसंप्रदायाला अनुसरूनच आहे.

सिनेमाचीं तिकिटें विकणारी ही नेहमींच एक स्त्री असते. ही वयानें तरुण, रूपानें सुंदर, नीटनेटका पोशाख केलेली असते. परंतु तिच्या भोंवतीं घोटाळणारे किंवा छाटकी म्हणून तिची चेष्टा करणारे प्रेक्षक नसतात. कोणत्याहि सिनेमाच्या तिकिटाचा दर एकच असतो. फरक जो आहे तो बाल व प्रौढांच्या तिकिटांत. सिनेमाच्या चित्रपटावर व

व आंतमध्यें असलेल्या ऐषआरामाच्या सोईवर हा दर ठरविलेला असतो. साधारण सिनेमास ३० सेंट्स ( सुमारें १॥ रु. ) द्यावे लागतात.

सुट्टीच्या दिवसांत दुपारीं तीन वाजतां सिनेमाचे खेळ सुरू होतात. आपल्याकडे ज्याप्रमाणें ' फर्स्ट शो ' व ' सेकंड शो ' दाखवितात त्या_ प्रमाणें तेथें नाहीं. एकदां कथानकाची रीळ सुरुवातीला लावावयाची तें शेवटपर्यंत म्हणजे कथानक संपल्यावर वेळ न दवडतां हीच रीळ रात्रीं एक वाजेपर्यंत दाखवायची असते. त्याचप्रमाणें प्रेक्षकांची ये–जा सारखी चालू असते. परंतु जमिनींवर मखमलीसारखे गालिचे असल्यामुळें पायांचा आवाज होत नाहीं आणि रिकाम्या खुर्च्या भरून टाकण्याकरितां एक मार्गदर्शक असल्यामुळें आपल्या जागेकरितां भटकावें लागत नाहीं. या सोयीमुळें आपण केव्हांही सिनेमाला जाऊं शकतो. कथानकाच्या ज्या भागापासून आपण पहाण्यास सुरुवात केली आहे तो भाग पुनः रुपेरी पडद्यावर दिसूं लागला, म्हणजे पूर्ण कथानक पहाण्याचें संपलें. यानंतर तेथें बसणें वा न बसणें हें तुमच्यावर अवलंबून आहे. शेंकडों लोक येतात व जातात पण गोंगाट नाहीं. सर्वत्र शांतता दिसून येते.

सिनेमाचें अंतर्गृह अमेरिकन वैभवाला साजेसें आहे. येथील लॉबीमध्यें उंच उंच भरजरीचे व आकर्षक रंगाचे निसर्गाचे देखावे, आणि चित्रित केलेले पडदे भिंतीवर टांगलेले असतात. मऊ कुशनच्या कोचेस या पडद्याला लागून ठेविलेल्या असतात. छतापासून खालपर्यंत लोंबकळत असलेल्या कांचेच्या अनेक झुंबरांतून मंद व आल्हाददायक विजेचे दिवे प्रकाशत असतात. ही लॉबी म्हणजे सिनेमा प्रेक्षकांच्या विश्रांतीची जागा. या हॉलच्या दोन्ही बाजूला दोन खोल्या असतात व तेथें स्त्री–पुरुषांच्या शौचमुखमार्जनाची सोय केलेली असते. येथें आरसे, ऊन व थंड पाण्याचे नळ व घडी घालून ठेवलेले डझनावारी टॉवेल्स असतात. प्रत्येक ठिकाणीं स्वच्छता व टापटीप दिसून येते. कांहीं कांहीं सिनेमा-गृहांत टेलिफोन फुकट करण्याची सोय असते, तर कांहीं ठिकाणीं त्या सिनेमागृहानें चित्रित केलेलीं पोस्टाचीं कार्डें विनामूल्य प्रेक्षकांना देण्यांत

येतात. अशा कार्डांत आपल्या मजकुराकरितां थोडी जागा सोडलेली असते. अशीं कार्डें येथेंच लिहून आपल्या मित्रांना पोस्ट करतां येतात. आपलें सिनेमागृह अधिक लोकप्रिय व्हावें म्हणून अमेरिकन लोक अनेक युक्त्या योजितात.

केव्हां केव्हां एखाद्या सिनेमागृहाच्या मालकाविरुद्ध तेथील कामकरी लोक संप करतात. मात्र मालक दुसऱ्यांना आणून कामाला लावतो आणि आपलें काम चालूं ठेवतो. या वेळेस सिनेमागृहासमोरील देखावा पहाण्यासारखा असतो. संपावरील कामगार स्त्री–पुरुष आपल्याच गळ्यांत आपल्याच उंचीच्या पाट्या अडकावून सिनेमा गृहासमोरील फूटपाथवर वर्तुळाकार फिरत असतात. त्या पाट्यांवर त्यांच्या तक्रारी लिहिलेल्या असतात व तोंडानें सिनेमा बंद आहे असें ओरडून सांगण्याचा त्यांचा सपाटा चालूं असतो. सिनेमागृहाचा मालक भाडोत्री माणसाकडून सिनेमा चालूं आहे असें सांगतो. तिकीटविक्री चालूच असते. प्रत्यक्ष सिनेमाप्रेक्षकांना कांहींच त्रास होत नाही. ओरडणारे ओरडत असतात, पण प्रेक्षक आपल्या मर्जीप्रमाणें संथ रीतीनें वागत असतात. गोष्टी निकरावर जाऊं नयेत म्हणून पिस्तुल घेतलेले आणि काडतुसांचे सर अडकविलेले दोन राक्षसी देहयष्टीचे कॉन्स्टेबल या संपकरी घोळक्याबाहेर गोलाकृति फिरत असतात. जवळच ॲम्ब्युलन्स तयार असते. मला जी गम्मत वाटली ती ही कीं, संपकरी स्त्रीहि गळ्यांत हरताळाची पाटी अडकवून मोठ्या आवेशांत ओरडत असते !

# प्रकरण १७ वें

"स्टेज शो" दाखविणाऱ्या सिनेमागृहाला नेहमींच गर्दी असते. चित्रपटाच्या रंगभूमीवर चित्रपट सुरू होण्यापूर्वी जे खेळ व देखावे दाखवितात त्याला 'स्टेज शो' म्हणतात. कांहीं सिनेमागृहाच्या रंग-भूमीवर जादूचे प्रयोग, शक्तीचे प्रयोग अथवा एखाद्या स्त्रीचा अभिनय-युक्त नाच करून दाखवितात. 'स्टेज शो' करितां न्यूयॉर्क शहरांतील रेडिओ सिटी म्युझिक हॉल प्रसिद्ध आहे. सुमारें सात हजार प्रेक्षक एका वेळेला आपल्या जागेवर अत्यंत उत्तम रीतीनें रंगभूमीच्या कोणत्याहि भागांत होत असलेला अभिनय पाहूं शकतात. या गृहाच्या छताला रात्रीच्या आकाशाचा रंग व रूप दिल्यामुळें आपण उघड्यावर बसून खेळ बघत आहोंत असा भास होतो. स्टेजवर एकाच वेळीं तीनशें नट—नटी अभिनय करतील इतकी जागा असते. विजेच्या मदतीनें या रंगभूमीचा पृष्ठभाग व देखावे बदलत असतात. एखादे वेळेस रंगभूमीच्या पृष्ठभागांतून हळुहळू शेतकऱ्यांची झोंपडी वर येते, तर एखादे वेळेस राजवाड्याचा भाग येतो. ज्या रीतीनें हे भाग वर येतात त्याचप्रमाणें खालींहि जातात. या रंगभूमीच्या झोंपडीसमोर अथवा राजवाड्यासमोर हा नृत्याचा कार्यक्रम होतो. सारख्याच उंचीच्या व अत्यंत आकर्षक व चमकदार पोशाखानें नटलेल्या शेंकडों नटी एका तालांत विद्युल्लतेच्या वेगानें नृत्य करीत असतात. रंगभूमीच्या झोपडींतून अथवा राजवाड्यां-तून एक जोडपें बाहेर पडून शेंकडों नटींच्या केंद्रस्थानीं उपस्थित होऊन नृत्याला सुरुवात करतें. या रंगभूमीला लागूनच पुढील भागीं सुमारे १०० माणसांचा बँड व मंजुळ वाद्यांचा एक ताफा बसलेला असतो. शेंकडों वाद्यांचें समुद्राच्या लहरीप्रमाणें वरखालीं होणारे सूर रंगभूमीवर नाचत असलेल्या शेंकडों नटींच्या अभिनयाप्रमाणें बदलतात. कांहीं काळ अंधारांत बसलेले आणि काळ्या युनिफॉर्ममध्यें असलेले हे वादनकार आपल्या कामांत निमग्न असतांनाच आपल्या पायाखालील

स्टेजसहित आपोआप वर उचलले जातात आणि हें छोटेसें स्टेज नटीच्या डोकीवरून पाठामीगें जाऊन मुख्य रंगभूमीवर असलेल्या झोपडीची किंवा राजवाड्याची गॅलरी होते. या दिवसाच्या दैनंदिनींत मीं याचें वर्णन टिपण करून ठेवलें आहे. " —झगझगीत व अत्यंत विरल अशा निळया आणि पिवळ्या फ्रॉक्स घातलेल्या तरुण मुलींचा नाच, कंबरेपासून खालीं लवचीक असा अंगविक्षेप, या तरुणींवर होत असलेला रंगीबेरंगी प्रकाशकिरणांचा मारा व बँडच्या ताफ्यासहित फिरणारे स्टेज वगैरे पाहून पुराणांत वर्णन केलेल्या गंधर्वनगरींत आलों असें वाटतें— "

अशा 'स्टेज शो' नंतर चित्रपट दाखविला जातो. मीं या ठिकाणीं पाहिलेला चित्रपट माझ्या डोळयासमोर आहे. एक सुंदर तरुण मुलगी बेसबॉल चांगला खेळतो म्हणून एका तरुणाच्या प्रेमपाशांत पडते. ती फार श्रीमंत व तो फार गरीब असतो. विवाह झाल्यानंतर मधुचंद्राच्या कालांत अकस्मात् अपघातानें त्याच्या पायाला जखम होते व तो पाय दवाखान्यांत कापला जातो. लंगडा झाला म्हणून आणि 'बेसबॉल' खेळता येत नाहीं म्हणून तो अत्यंत दुःखी होतो. अशा स्थितींत पत्नी एकनिष्ठ राहते. कृत्रिम पाय बसवून घेतल्यावर तो पुनः पूर्ववत् बेसबॉल खेळतो आणि जगप्रसिद्ध होतो. मनुष्य दृढनिश्चयी असेल तर त्याला शारीरिक व्यंगावर विजय मिळवितां येतो हें शेवटीं दाखविलें आहे.

एके ठिकाणीं एक चित्रपट पहात असतांना सामान्य ज्ञानाच्या विभागांत भारतांतील अत्यन्त सुंदर शहर म्हणून जयपूर शहराचें वर्णन आणि देखावे रुपेरी पडद्यावर दाखविले होते. भारतीय संस्कृतीचें चित्रपट येथें पहाण्याचा मीं पुष्कळ प्रयत्न केला, पण कांहीं सुगावा लागला नाहीं: उलट मात्र मला अनुभव आला. मी एकदां एका रिस्टॉरंटमध्यें जेवावयास गेलों. माझ्या टेबलाभोंवतीं सर्व अमेरिकन स्त्री-पुरुष बसले होते. आमच्या इकडच्या तिकडच्या गप्पा सुरू झाल्या. माझ्या शेजारीं बसलेला मनुष्य कांहीं दिवस कलकत्त्याला राहिला होता. हिंदुस्थानबद्दल बोलतांना माझ्यासमोर बसलेले गृहस्थ म्हणाले—'तुमच्या देशांतील

स्त्रिया कंबरेवरचा भाग वस्त्ररहित कां ठेवतात?' मी म्हणालों—"तुमची माहिती अत्यंत चुकीची आहे. आमच्या स्त्रियांचा पोशाख कोणत्याहि सुधारलेल्या राष्ट्रांतील स्त्रियांच्या पोषाखापेक्षां अत्यन्त विनयशील व आकर्षक आहे."

माझ्या शेजारीं बसलेल्या गृहस्थानें माझी बाजू घेतली व ते पुढें म्हणाले—"मी मुंबई व कलकत्ता पाहून आलों आहे. तेथील स्त्रिया अर्धविवस्त्र नसतात". परंतु समोरच्या गृहस्थाला तें पटेना. ते म्हणाले—"मी पुष्कळ भारतीय स्त्रिया चित्रपटांत पाहिल्या त्या फारच ओंगळ ( Nasty ) दिसतात. अमक्या ठिकाणीं एक चित्रपट चालूं आहे, तेथें जाऊन तुम्ही पहा."

अशा विरोधी भाषणानें माझ्या जेवणाचा सर्व विचका झाला. चौकशी अंतीं असें कळालें कीं, येथें हिंदुस्थानविरोधी चित्रपट दाखविले जातात. यापेक्षां जास्त माहिती मला मिळूं शकली नाहीं.

न्यूयॉर्क शहरांत व इतर ठिकाणीं सिनेमागृहाच्या दारांत भिकारी पाहिले. एक भिकारी मीं पाहिला, तो अंध होता. त्यानें I am blind अशी पाटी गळ्यांत बांधली होती आणि फिडल घेऊन तो गात होता. त्यानें पैशाकरितां टोपी उलटी ठेवली होती. कित्येक भिकारी डझनावारी शिसपेन्सिली घेऊन रस्त्यानें हिंडतात. भीक-विरोधी कायदा असल्यामुळें पोलिसानें चौकशी केल्यास पेन्सिली विकतो म्हणून सांगतात व पुनः आपलें भीक मागण्याचें काम सुरू करतात.

---

# प्रकरण १८ वें

राष्ट्राची संपत्ति डॉलर नसून डॉलरला उत्पन्न करणारा मनुष्यप्राणी आहे. मनुष्यप्राण्याची हानि शक्यतों कमी करून त्याला अर्थोत्पादनाच्या धंद्यांत गुंतविण्याचीं अनेक साधनें अमेरिकेच्या सरकारनें उपलब्ध करून ठेविलीं आहेत. मोटारीच्या आणि कारखान्याच्या अपघातानें प्रत्येक वर्षी

सुमारें चार लाख माणसें जखमी होतात. याशिवाय मृत असलेल्यांची संख्या वेगळीच. उपाय व उपचाराशिवाय—ही जखमी लोकांची संख्या फुगत गेली तर कांहीं वर्षांनीं अमेरिका पांगळ्या, थोट्या लोकांनीं भरून जाईल व देशाच्या संपत्तीला ओहोटी लागेल म्हणून येथील सरकार फार काळजी घेतें. वैद्यकीय सल्ला, मदत आणि कृत्रिम अवयव हीं विनामूल्य देण्यांत येतात. कोणत्याहि धंद्यांत त्यांना योग्य ती नोकरी देण्यांत येते. स्वतःचा धंदा करावयाचा असल्यास धंद्याला लागणारीं उपकरणें व इतर सामान सरकार फुकट देतें. अशा प्रकारचा कृत्रिम हस्त व पादकारी मनुष्य नोकरी कशा प्रकारें करतो याचें बारकाईनें निरीक्षण करून तीन तीन महिन्यांनीं वरिष्ठांकडून अहवाल मागविला जातो. हा अहवाल समाधानकारक नसेल अथवा त्याचा खाजगी धंदा नुकसानींत असेल तर त्याची पुनः शारीरिक व मानसिक परीक्षा करून निराळ्या प्रकारचें अर्थोत्पादक धंदेशिक्षण देण्यात येतें. जखमी झाल्यापासून तों आपल्या कमाईनें पोट भरण्याचें सामर्थ्य येईपर्यंत या मनुष्याच्या उदर-भरणाची व्यवस्था सरकारनें केली आहे.

एके दिवशीं न्यूयॉर्क शहरांतील प्रसिद्ध अशा अवयवच्छेदनाच्या दवाखान्याला मीं भेट दिली. एक किंवा दोनही तंगड्यांचें उच्छेदन केलेलें, इतकेंच नव्हे तर, कांहींचे दंडही कापलेले लोक मला आढळून आले. उच्छेदनानंतर कांहींची जखम कशी भरून येते हेंही मीं पाहिलें. जखम बरी झाल्यानंतर अवशिष्ट राहिलेल्या अवयवांत कृत्रिम अवयव कसे बसवितात याचेंहि मीं निरीक्षण केलें. या हॉस्पिटलचे मुख्य सर्जन डॉ. कॅंबेलसाहेबानें एका माणसाला माझ्यापुढें उभें केलें. मला वाटलें कीं तो आपल्या मित्राची ओळख करून देणार आहे. सूट घातलेल्या आणि सर्जनबरोबर सहज रीतीनें चालणाऱ्या मनुष्याबद्दल मला काय कुतूहल वाटणार ? आम्ही तिघेही एका लहानशा खोलींत गेलों. सर्जनच्या आदेशानुसार त्यानें आपली पॅंट काढली. दोन्हीहि तंगड्या आकारानें व रंगानें मला सारख्याच दिसल्या. लवही सारखीच होती. मी घोटाळ्यांत

पडलों आहे असें पाहून त्या सर्जननें त्याचा तो कृत्रिम पाय मला काढून दाखविला.

नुसते कृत्रिम अवयव बसवून चालत नाहीं, तर कृत्रिम अवयवांत चालना व कार्यक्षमता उत्पन्न करण्याकरितां व या अवयवांच्या पाठीमागें असलेल्या शेष अवयवांना बळकटी आणण्याकरितां तज्ज्ञ डॉक्टरांच्या देखरेखीखालीं असलेल्या व्यायामविभागांत अशा मनुष्याला कांहीं दिवस घालवावे लागतात. अशा व्यायामशाळेंत डॉक्टर रस्क इन्स्टिटयूट ही फार प्रसिद्ध संस्था आहे. शेष अवयवांना मालिश करून कृत्रिम अवयव बसवितात. नंतर अशा लोकांचे सामुदायिक हातापायांचे हालचालीचे व्यायाम घेतले जातात. बळकटी आल्यानंतर बारीक सारीक चेंडूचे खेळ त्यांच्याकडून खेळविले जातात. कांहीं काळानंतर अशा कृत्रिम अवयवांत नैसर्गिक कार्यक्षमता उत्पन्न होते व शेवटीं त्यांची रवानगी धंदेशिक्षणाकडे होते.

दरमहा तीनशें डॉलर म्हणजे सुमारे तेराशें रुपये मिळविणाऱ्या स्टेनोटायपिस्टची मीं भेट घेतली. याचे दोन्ही हात व बोटें सर्व कृत्रिम होतीं. त्याची अपघातापूर्वीची मिळकत व आतांची मिळकत यांत सध्या फारसा फरक नव्हता. याच्या कामाबद्दल सरकारी रिपोर्ट अत्यंत समाधानकारक होते. माझ्या विनंतीवरून त्यानें काडी ओढून सिगारेट पेटविली. सेफ्टी रेझरनें दाढी कशी करतो, जेवतांना कांटे-चमचे पकडण्याची क्रिया कशी करतो हेंहि त्यांनीं मला दाखविलें. माझ्या सांगण्यावरून त्यानें आपला पोशाख काढला. छातीच्या वरच्या स्नायूवर आणि अवशेष राहिलेल्या बाहूच्या स्नायूवर व पाठीच्या स्नायूवर अनेक लहानमोठे स्प्रिंग्ज कंपित झालेले दिसत. इच्छित लहरी कृत्रिम बोटाकडे जाऊन बोटांची हालचाल दिसून येत असे. नंतर मीं या गृहस्थाचे आभार मानले व त्याचा निरोप घेतला. तेथेंच मीं एक लोहार पाहिला. तो आपल्या कृत्रिम हातांत हातोडी धरून ऐरणीवर घण मारीत होता. येथें कृत्रिम हात व पाय बसविलेल्या तरुणांची एक बेसबॉलची टीम तयार केली आहे. या टीमनें

एका धष्टपुष्ट टीमला आव्हान दिलें. अमेरिकेंतील सर्व वर्तमानपत्रांत व रेडिओवर त्यांची प्रसिद्धि झाली. हा खेळ पाहण्यास सुमारें दहा लक्ष लोक जमले होते. अध्यक्ष ट्रुमनही खेळ पाहण्यास आले होते. खेळगडी कृत्रिम हातानें बॅट धरून चेंडूला फटकारा देतांना अथवा कृत्रिम पायानें धांवा काढतांना प्रेक्षकांमध्यें आनंदाच्या प्रचंड आरोळ्या उठत. कित्येक टोप्या वर फेंकल्या जात. लहान लहान मुलें शेजारच्या माणसावर फेकलीं जात. अशा वेळीं ट्रुमनही स्वतःचा मोठेपणा विसरत व या आनंदांत भाग घेत. अपघातानें वा दुर्दैवानें निरुपयोगी झालेल्या माणसांत नवचैतन्य उत्पन्न केल्याचें सर्व श्रेय ट्रुमन सरकारला आहे. पंगुलोकांना इतर माणसांप्रमाणेंच राष्ट्रीय सुखसोई उपभोगण्याचा हक्क आहे व माझें सरकार या कामाला सर्वांत जास्त महत्त्व देतें, असें अध्यक्ष ट्रुमन यांनीं आपल्या भाषणांत या प्रसंगीं सांगितलें.

---

# प्रकरण १९ वें

प्रौढपणीं पंगू झालेल्या माणसांची अमेरिकन सरकारनें पुनर्व्यवसायाची ज्याप्रमाणें उत्तम सोय करून ठेवली आहे, त्याचप्रमाणें वयाच्या एकवीस वर्षांच्या आंत पंगू झालेल्या मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था केली आहे. बालवयांत पंगू झालेल्या मुलांची संख्या सुमारें चार लाख आहे. आपल्या पंगुत्वामुळें सर्वसामान्य मुलांबरोबर विद्याभ्यास करूं शकत नाहींत म्हणून अशा मुलांमुलींकरितां पांचशें शिक्षणसंस्था येथें काम करीत आहेत. यांत अंध व मूक मुलांचा समावेश बिलकुल होत नाहीं. त्या संस्था निराळ्या आहेत.

पंगू मुलांचीं शारीरिक व्यंगें अनेक आहेत व हीं व्यंगें उद्भूत होण्याचीं कारणेंहि अनेक आहेत. अमेरिकेनें आपल्या शास्त्रीय शोधानें

आणि सार्वजनिक सुधारणेनें राष्ट्रांतून पुष्कळ रोगांची हकालपट्टी केली आहे. परंतु या यांत्रिक युगांत मज्जातंतूवर वरचेवर होत असलेल्या आघातामुळें सुधारणेचे रोग (Diseases of Civilization) समाजांत पसरले आहेत. अनेक रोगांनीं मुलें पंगु होतात, परंतु सर्वांत 'पोलियो' हा रोग तेथील मुलांमध्यें जास्त प्रमाणांत आढळून येतो. पोलियोचें पूर्ण नांव पोलियोमलायटीज् हें आहे. या रोगांत मुलाला ताप येऊन कंबरेपासूनचा खालचा भाग निःसत्त्व होतो. शेंकडा चाळीस टक्के मुलें या रोगामुळें पंगू होतात. पोलियोच्या विरुद्ध मोहीम ही अमेरिकेंत मोठी राष्ट्रीय विधायक चळवळ समजली जाते. हा रोग लढाईपेक्षां जास्त संहारक आहे अशी त्यांची समजूत असून पोलियोविरोधी राष्ट्रीय आठवडा पाळण्यांत येतो. या दिवशीं प्रतिबंधक उपायांचा प्रचार करण्यांत येतो. लाखों डॉलर्स देणगी जमवून अशा मुलांना मदत करण्यांत येते. न्यूयॉर्क शहरांत मोठमोठ्या दुकानांच्या प्रवेशद्वारीं, तीन फूट उंचीचें पीप असतें. या पिपावर ' पोलियोशीं लढा ' असें मोठ्या अक्षरांत लिहिलेलें असतें. या पिपाच्या पृष्ठभागावर असलेल्या चिरींतून पैशाची मदत टाकली जाते.

अनेक कारणांनीं कायमचे पंगू झालेल्या विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची जबाबदारी सरकारनें आपल्यावर घेतली आहे. वर सांगितल्याप्रमाणें या पांचशें शिक्षणसंस्थांत जेवणाची, राहण्याची आणि शिक्षणाची व्यवस्था कोणत्याहि प्रकारचें शुल्क न घेतां केलेली आहे. पंगुत्वामुळें प्राप्त झालेलीं शारीरिक व्यंगें शक्य तितकीं शास्त्रीय उपकरणानें घालविलीं जातात. शाळेंत शिक्षण चालू असतांनाच या व्यंगावरही उपचार व उपायहि चालू असतात. अशा शाळांना कांहीं ठिकाणीं ' Hospital schools ' असें म्हणतात. वयाच्या एकवीस वर्षापर्यंत पंगू विद्यार्थ्यांना शिक्षण घेणें अवश्य आहे. कोणत्या तरी धंद्यांत स्वतंत्र रीतीनें उदरंभरण करण्याचें सामर्थ्य आल्यानंतरच शाळेंतून रजा मिळते. शाळा सोडल्यावर प्रांतीय सरकार आणि केंद्रीय सरकार अशा माणसांना योग्य मार्गदर्शन करून त्यांना अर्थोत्पादनाच्या धंद्यांत अडकवितें. नोकरी मिळाली नाहीं अथवा शारीरिक व्यंगामुळें

कोणताहि धंदा करणें अशक्य झाल्यास, सरकार बेकारीचें पेन्शन किंवा अगतिक पेन्शन देतें. ही रक्कम दरमहा साठ डॉलर म्हणजे सुमारें अडीचशें रुपयांपेक्षां कमी नसते.

मीं पंगू मुलांची शाळा पाहिली. मुलांच्या शारीरिक व्यंगाप्रमाणें त्या त्या मुलांना योग्य अशी खुर्ची व टेबल देण्यांत आलें होतें. दोन्ही पाय नसलेलीं मुलें तीन चाकी खुर्चीवर बसून एका वर्गांतून दुसऱ्या वर्गात जात. अशा शाळेच्या इमारतींत एका मजल्यावरून दुसऱ्या मजल्यावर जावयाचें असल्यास जिना नसतो. फार लांबच लांब उतरणीचा रस्ता असतो. या तीन चाकी खुर्च्यांवर बसून आपल्या हातानेंच पॅडल फिरवीत शांगेनें मुलें खालीं उतरतात अथवा चढतात. खुर्चीवर बसून व्हॉलीबॉलचा खेळ खेळण्याचीहि येथें सोय आहे.

या मुलांचा शारीरिक व बौद्धिक विकास होण्यास बरींच माणसें कारणीभूत आहेत. शिक्षिका, परिचारिका, समाजसेविका, डॉक्टर, व्यायामतज्ज्ञ, हस्तव्यवसाय शिकविणारे तज्ज्ञ असे अनेक सेवक एकेका मुलाकरितां रात्रंदिवस झटत असतात. भविष्यकाळीं या मुलांचें जीवन स्वावलंबी व सुखमय होण्यासाठीं सुमारें पन्नास वर्षांपूर्वी शिकागो येथें पहिली शाळा उघडण्यांत आली. आतां या शाळांची वाढ आणि सुधारणा बऱ्याच प्रमाणांत झाली आहे. पंगू मुलांच्या संरक्षणार्थ सरकारी कायदे फार कडक आहेत. अशा मुलांच्या शारीरिक, मानसिक व बौद्धिक बलसंवर्धनार्थ ज्या शाळा आहेत आणि अशा शाळेंत काम करणारे जे लोक आहेत, त्यांना समाजांत मोठें सन्मानाचें स्थान दिलें जातें.

एकदां एके ठिकाणीं एक पांच वर्षांचें मूल एका संस्थेंत मीं पाहिलें. हा मुलगा खेडेगांवांत रहाणारा होता. अनेक शारीरिक व मानसिक व्यंगें या मुलामध्यें केंद्रीभूत झालीं होतीं. अमेरिकन कायद्याप्रमाणें कोणतेंहि व्यंग असलेल्या मुलाला घरीं ठेवून घेतां येत नाहीं. घरीं ठेवून घेतल्यास आई-बापांना शिक्षा होते. हा मुलगा अंध, बाधिर, मूक व वेडा होता. एका पायानें लंगडाही दिसत होता. अशा अनेक व्यंगयुक्त मुलाचें काय करावयाचें?

मुलाचा पत्ता लागल्याबरोबर केंद्रीय सरकारच्या समाजहितसंरक्षक खात्यानें एक कमिटी नेमली. जगांतील नामांकित असे डॉक्टर, मानसशास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ, मनोविश्लेषणशास्त्रज्ञ एकत्र जमले. अकस्मात् मी या संस्थेंत त्यावेळीं असल्यामुळें कमिटीचें काम पहाण्यास मला संधि मिळाली. आम्ही वर्तुळाकार ठेवलेल्या कोचावर बसलों. प्रथमतः या मुलाचा सर्वांना पूर्वेतिहास सांगण्यांत आला. नंतर एका नर्सनें या मुलाला आणून मध्यभागीं बसविलें. त्याला पहातां येत नव्हतें, बोलतां येत नव्हतें, ऐकूं येत नव्हतें आणि या सर्वांवर ताण म्हणजे पाय आपटणें, हात आपटणें आणि मान फिरविणें. त्याच्या या विकारावरून जमलेल्या तज्ज्ञ लोकांच्या विचाराला चालना मिळाली. माझ्या शेजारीं बसलेल्या एका समाजशास्त्रज्ञाला माझें या विषयावरील अज्ञान झाकण्याचा प्रयत्न करीत मी म्हणालों— " हा मुलगा योग्य व सन्माननीय नागरिक होण्याची शक्यता आहे काय ? "

" आमच्या प्रयत्नानें तो पुढें एखाद्या कारखान्याचा मालक अथवा राष्ट्राचा नेता होईल. मूल कितीहि व्यंगानें ग्रासिलेलें असो तें पवित्र व माननीय आहे आणि त्याची सेवा करणें हें सुधारलेल्या राष्ट्राचें कर्तव्य आहे. " त्याचें उत्तर ऐकून मी चाटच पडलों. भारतांत असा मुलगा आढळला तर तुम्ही काय करितां असें त्यांनीं मला विचारलें, तेव्हां मी म्हणालों—" आम्ही त्याला निसर्गाच्या स्वाधीन करतों व निसर्ग त्याला लवकरच या शारीरिक पिंजऱ्यांतून मोकळें करतो. त्यामुळें आम्ही अशा कमिटीच्या कधींच फंदांत पडत नाहीं. "

---

# प्रकरण २० वें

न्यूयॉर्क शहरांत असतांना आम्ही एकदां वॉशिंग्टन पूल पहाण्यास गेलों. हा पूल हडसन नदीवर आहे. न्यूयॉर्क व न्यूजर्सी या दोन शहरांस हा पूल जोडतो. हृषीकेशला गंगेवर जसा लक्ष्मणझूला नांवाचा पूल आहे, त्याचप्रमाणें हा झुलता पूल आहे. परंतु हा पूल त्या पुलापेक्षां कितीतरी पटींनें मोठा आहे.

एके दिवशीं आम्ही तिघे हिंदी विद्यार्थी व एक निग्रो मित्र मिळून आमचे हॉटेल शेजारीं असलेल्या भूगर्भरेल्वेच्या स्टेशनवर गेलों. शहराखालून प्रवास करीत एक तासानंतर आम्ही १८१ नंबरच्या स्टेशनवर उतरलों. आम्ही भूगर्भांतून वर आलों तों एका अफाट अशा रस्त्यांच्या



वॉशिंग्टन झुलता पूल न्यूयॉर्क

फूटपाथवर उभे आहोंत असें दिसून आलें आणि डाव्या बाजूला पूलही दिसूं लागला. पुलाच्या बाजूनें आम्ही चाललों. नेहमींप्रमाणें मोटारींची रहदारी येथेंहि असल्यामुळें रस्ता सुखासुखीं पार करणें अशक्य होतें.

म्हणतात ना—"आत्महत्या करावयाची असल्यास न्यूयॉर्क शहरांतील रस्ता ओलांडा म्हणजे आपोआपच कार्यसिद्धि होईल."

पुलाच्या दोन्ही बाजूला फूटपाथ काढले आहेत व या फूटपाथवरून पलीकडच्या फूटपाथवर जातां येऊं नये इतका उंच कठडा बांधला आहे. हा बिनखांबी व बिनकमानीचा पूल जाड अशा दोन लोखंडी तारांवर आधारला आहे. या तारांच्या खालच्या बाजूला असलेल्या गर्डर्सवर रुंद असा डांबरी रस्ता तयार केला आहे. एका वेळेस चार मोटारी जातील आणि चार मोटारी येतील इतका मधला रस्ता मोठा आहे. आम्ही पुलाच्या फूटपाथवरून चालत पुलाच्या मध्यभागीं आलों. मोटारीच्या रहदारीनें आमच्या पायाला सारखे हादरे बसत. कठड्यावर दोन्ही हात ठेवून आम्हीं खालीं पाहिलें. नौकागमनाला योग्य अशा या नदींतून जाणाऱ्या कितीतरी प्रचंड नौका आम्हांला येथून लहान दिसत होत्या. याशिवाय लहान लहान होडींत बसून कित्येक स्त्री–पुरुष जातांना आम्हांला दिसले. या होड्या मोटारीच्या साहाय्यानें चालतात. त्यामुळें पाण्याच्या पृष्ठभागावरसुद्धां त्यांचा वेग जमिनीच्या मोटारीप्रमाणेंच असतो. प्रचंड वेगानें पाण्याला कापून जाणाऱ्या मोटारलाँचचें पुढील पाणी उसळत असें तर पाठीमागें खोल खळगा पडे. नदीच्या खालच्या बाजूला दोन्ही किनाऱ्यांवर दोन प्रचंड शहरें आहेत. डाव्या बाजूला न्यूयॉर्क व उजव्या बाजूला न्यूजर्सी. हा पूल फारच उंच असल्यामुळें न्यूयॉर्क शहराच्या गगनचुंबी इमारती निरभ्र आकाशाच्या पार्श्वभूमीमुळें स्पष्ट व सारख्याच उंचीच्या दिसत. न्यूजर्सी शहर पहाडी जंगलांत लपल्यामुळें फार प्रयत्नानंतर एखादी इमारत आपल्या दृष्टीस पडते. नदीच्या वरच्या बाजूच्या दोन्ही किनाऱ्यांवर दाट झाडी आहे. नदीचें पाणी फार खोल व संथ असल्यामुळें दरडीवरचीं झाडें टिकून राहिलीं आहेत. क्वचित् ठिकाणीं पांढरी वाळू दिसते. नदीच्या किनाऱ्याला लागून असलेल्या नैसर्गिक जंगलाला अमेरिकन सरकारनें बागेचें रूप देऊन सहलीकरितां योग्य अशा सोयी येथें केल्या आहेत. आम्हीं

पुलावरून अनेक स्त्रीपुरुषांच्या टोळया नदीच्या किनारीं वनविहारांत मजा करीत असलेल्या पाहिल्या. वाळवंटांत जवळ जवळ नग्नावस्थेंत असलेलीं माणसें आतपस्नान, जलस्नान व वालुकास्नान मनसोक्त घेतांना दिसलीं. बराच वेळ अशा प्रकारचें दृश्य पाहिल्यावर आम्हीं आपापसांत फोटो काढून घेतले. परत येतांना पुलाच्या दर्शनीय भागावर बसविलेला एक शिलालेख आम्हीं पाहिला. या लेखांत या पुलाचा इतिहास सांगितला होता. हा पूल सन १९३१ सालीं बांधून पूर्ण झाला. याची लांबी तीन हजार पांचशें फूट आहे व हा तयार करण्याला सहा कोटी डॉलर म्हणजे सुमारें पंचवीस कोटी रुपये खर्च आला.

या सहलींत आमचा मार्गदर्शक एक निग्रो पदवीधर मिळाल्यामुळें आमची चांगलीच करमणूक झाली. वर्णभेदांची प्रथा अमेरिकेंत कशी आहे याचें रसभरीत वर्णन त्यांनीं केलें.

**कोलंबस सर्कल:**—कोलंबसनें अमेरिकेचा शोध लावला म्हणून त्याचा संगमरवरी पुतळा ब्रॉडवे आणि आठवा ॲव्हेन्यूच्या संगमाच्या मध्यभागीं बसविला आहे. सुमारें पन्नास फूट उंचीच्या संगमरवरी खांबावर कोलंबस उभा आहे. या खांबाखालीं त्या काळांत कोलंबसनें उपयोगांत आणलेल्या बोटी व नांगराचे नमुने संगमरवरी दगडांचेच तयार करून ठेवले आहेत. अमेरिकेंतील इटॅलियन रहिवाशांनीं हें स्मारक १८९२ सालीं आपल्या खर्चानें उभें केलें आहे. या स्मारकाच्या भोंवतीं रुंदच रुंद रस्ते आहेत. संध्याकाळीं विशेषत: येथें पाहण्यासारखें व ऐकण्यासारखें बरेंच असतें. या चौथऱ्यावर उभे राहून कोणीहि राजकीय किंवा धार्मिक विषयावर व्याख्यानें देऊं शकतात. वक्ता ठरलेला नसतो व श्रोत्यांना पण आगाऊ सूचना नसते. भाषणस्वातंत्र्य असल्यामुळें प्रतिपक्षावर टीकेची झोड ऐकण्यास मिळते. परंतु पुढाऱ्यांच्या खाजगी वर्तनांत कोणीच हात घालीत नाहीं. अमक्या कारणामुळें तुम्ही ट्रूमनला मत देऊं नका असें सांगणारेहि मीं पाहिले. धार्मिक व्याख्यानाचा आरंभ नेहमीं

संगीतानें व्हायचा. या कोलंबसच्या चबुतऱ्यावर एकाच वेळीं आठ दहा व्याख्यानें चालूं असतात. कांहीं ठिकाणीं श्रोतेहि नसतात, पण वक्ता जणुं कांहीं हजारों लोकांसमोर व्याख्यान देत आहे अशा आवेशांत वक्तृत्व झोडतो !

---

# प्रकरण २१ वें

अमेरिकेंतील अंधशिक्षणाचा इतिहास सुमारें सव्वाशें वर्षांचा आहे. नवीन नवीन कल्पना युरोपांतून आपल्या देशांत आणावयाची व आपल्या संशोधक बुद्धीनें त्या कल्पनेचा विकास व विस्तार करून राष्ट्राच्या अर्थोत्पादनांत भर टाकावयाची अशी परंपरा गेल्या दोन शतकांत अमेरिकन लोकांनीं चालूं ठेवली आहे. यामुळें युरोपियन देशापेक्षां अमेरिकेची प्रगति जास्त झालेली आपल्याला दिसून येते. आधुनिक शिक्षणपद्धतीवर आधारलेली पहिली अंधशाळा अठराव्या शतकांत फ्रान्समध्यें स्थापन झाली. त्यानंतर युरोपमध्यें पुष्कळच अंधशाळा निघाल्या. परंतु अमेरिकेनें या बाबतींत उच्चांक गांठला आहे. न्यूयॉर्क शहर पाहिल्यावर लंडन हें जुनाट व मागासलेलें शहर वाटतें. त्याचप्रमाणें अमेरिकेंतील अंधशिक्षणाची व अंध व्यवसायकेंद्रांची व्यवस्था पाहून अमेरिकेपासून युरोपला पुष्कळच शिकावयाचें आहे असें वाटल्यावांचून रहात नाहीं.

अंध मुलामुलींचें शिक्षण सक्तीचें असल्यामुळें या शाळा सर्व देशांत पसरलेल्या दिसतात. केंद्रीय व प्रांतीय सरकारच्या शिक्षणखात्यांत अंधशिक्षणाच्या खास शाखा आहेत. या सर्व शाळा वसतिगृहाच्या असल्यामुळें त्यांचा विस्तार आपल्याकडील एखाद्या नमुनेदार कॉलेजप्रमाणें असतो. शिक्षणाचा व वसतिगृहाचा सर्व खर्च सरकार करतें.



अंध, मूक व बहिरा शेतकरी लेखकाच्या ओंठावर आपला आंगठा ठेवून लेखकाचें बोलणें समजून घेत आहे.

## कांहीं बोलके आंकडे

| | अनुक्रमांक | अमेरिका | हिंदुस्थान |
|---|---|---|---|
| (१) | अंधजनसंख्या | एक लक्ष | वीस लक्ष |
| (२) | अंधशाळा | १२० | ३२ |
| (३) | शाळेंत शिकणारे अंध विद्यार्थी | ९००० | १००० |
| (४) | अंध शाळेंतील शिक्षक संख्या | ८०० | १०० |
| (५) | दर हजारी अंधजनसंख्या | १ | ५ |
| (६) | एक अंध विद्यार्थ्याकरितां सरासरी वार्षिक शिक्षणखर्च | सहा हजार रुपये | उपेक्षणीय |
| (७) | प्रौढ धंद्यांचीं व्यवसाय केंद्रें | १०० | १ |
| (८) | नोकरी अथवा धंदा करणाऱ्या प्रत्येक प्रौढ अंधाची सरासरी वार्षिक मिळकत | ३८०० रु. ते ४७५० रु. | आंकडा उपलब्ध नाहीं |

येथें अंधशिक्षणास लागणारीं उपकरणीं तयार करण्याचे कारखाने सुमारें वीस आहेत, तर हिंदुस्थानांत एकही कारखाना नाहीं. ब्रेल पद्धतीनें ग्रंथ छापणारे लहानमोठे असें दोनशें छापखाने अमेरिकेंत आहेत, तर भारतीय सरकार असा छापखाना काढण्याची तयारी करीत आहे. अमेरिकन अंधां-करितां शेंकडों साप्ताहिकें, पाक्षिकें, मासिकपत्रें ब्रेल लिपींत छापून विनामूल्य व विनाटपालहंशील वाटण्यांत येतात, तर हिंदुस्थानांत अशा प्रकारचें एकहि पत्र निघत नाहीं. इंग्रजी भाषेंत असलेले सर्व ग्रंथ ब्रेल पद्धतींत आणून अंधांना ज्ञानाचा दरवाजा मोकळा केला आहे. ग्रामोफोन रिकॉर्ड पद्धतीप्रमाणें आतांपर्यंत अमेरिकन सरकारनें एक लाख ग्रंथांचे रिकॉर्डस् करून त्यांच्या अनेक प्रति अंधांना विनामूल्य देण्यांत येतात. या रिकॉर्डसना "Talking Books" म्हणजे 'बोलके ग्रंथ' असें म्हणतात. इंग्रजी वाङ्मयांतील नाटकें, कादंबऱ्यांपासून तों अनेक शास्त्रीय ग्रंथांचें रिकॉर्डिंग झालें आहे. हे 'बोलके ग्रंथ' तयार करण्याचे दोन मोठे कारखाने मीं पाहिले. भारतीय विद्वानांनीं इंग्रजी भाषेंत लिहिलेल्या एखाद्या ग्रंथाचें रिकॉर्डिंग झालें आहे काय याची मीं चौकशी केली. बोलक्या ग्रंथाची यादी मीं लायब्ररी ऑफ काँग्रेसमधून आण-विली. श्रीधराणी कृष्णलाल यांनीं लिहिलेले 'माय इंडिया, माय अमे-रिका' हा एकच ग्रंथ १९४२ सालीं रिकॉर्ड करून बोलक्या ग्रंथांत रूपांतर करण्यांत आला आहे. स्वामी विवेकानंद, रवींद्रनाथ टागोर, महात्मा गांधी, पंडित नेहरू यांसारख्या अनेक विद्वान् ग्रंथकारांच्या ग्रंथांचें रूपांतर टॉकिंग बुक्समध्यें करून भारतीय संस्कृतीची झुळूक अमेरिका व युरोपमधील इंग्रजी जाणणाऱ्या अंध विद्वानांना करून देणें शक्य आहे असा विचार माझ्या मनांत आला. त्या दृष्टीनें मीं वॉशिंग्टन येथील वकीलातींत जाऊन थोडीफार याबद्दल खटपटही केली, परंतु वेळेच्या अभावीं मी या गोष्टीकडे जास्त लक्ष घालूं शकलों नाहीं.

न्यूयॉर्क शहरांत असतांना मीं बऱ्याच अंध शाळांना भेटी दिल्या. पेलहॅम–पार्कमधील न्यूयॉर्क अंध विद्यालय ही अमेरिकेंतील पहिली शाळा

आहे. या शाळेंत मीं दोन दिवस निरीक्षणाचें काम केलें. या शाळेची इमारत सुमारें तीस एकर जमिनींवर पसरली आहे. येथें दोनशें विद्यार्थी आहेत. यांना शिक्षण देणारे शिक्षक व नोकर शंभरावर आहेत. किंडर-गार्टनपासून कॉलेज प्रवेशपरीक्षेपर्यंत डोळस शाळेप्रमाणें येथील अभ्यासक्रम आहे. धंदेशिक्षणांत मुलांना सुतारकाम, चर्मकाम, रेडिओ-दुरुस्ती, पियानो-दुरुस्ती, शेतकी व तदनुषंगिक धंदे शिकविले जातात. मधमाशांना पाळून मधाचा धंदा कसा करावा याचें व्यवहारी ज्ञान अंधांना येथें दिलें जातें. अंध मुलींकरितां विणकाम, कशिदा काम, पाकशास्त्र, सौंदर्यप्रसाधनशास्त्र वगैरे शिकविलें जातें. या शाळेचे प्रिन्सिपॉल डॉ. फराम्टन यांनीं माझें आनंदानें स्वागत करून सर्व माहिती पुरविली. हे अत्यंत विनोदी व अंधशिक्षण आणि मानसशास्त्राचे ग्रंथकर्ते आहेत. यांचे ग्रंथ जगांत प्रमाणग्रंथ मानले जातात. प्रथम भेटींतच मी त्यांना म्हणालों '—मी फार सुदैवी कीं, आपल्यासारख्या मोठ्या माणसाची भेट झाली.' फराम्टनसाहेब आपल्या शरीराकडे पहात व हंसत म्हणाले, 'जरा अमेरिकेच्या अंतरभागांत प्रवास करा म्हणजे तुम्हाला अनेक फॅराम्टन भेटतील.'

या शाळेच्या एका भोजनप्रसंगीं मुख्य सन्माननीय पाहुणा म्हणून मी निमंत्रित असतांना अनेक खाद्यपदार्थ माझ्यासमोर आले. या शाळेंतील एका जन्मांध रेडिओ इंजिनीयरच्या देखरेखीखालीं शिक्षण घेत असलेले एक भारतीय पदवीधर ( हे डोळस आहेत ) माझ्या शेजारीं बसले होते. भोजन आटोपल्यावर ते मला म्हणाले — "काय राव, बीफ खाण्यास केव्हांपासून सुरुवात केली ?"

मी म्हणालों — "मी कडक शाकाहारी आहे."

ते — "अहो ! टोमॅटो व काकडीच्या चकतीबरोबर असलेले लाल चकते हे बीफचें गोमांस होतें आणि तुम्ही सर्वच बशी पार केली."

मी — "नकळत खाल्यास त्यांत काय दोष ? मांसाहारी लोक मांस खाल्ल्यानें पापी बनतात असेंहि मी समजत नाहीं. परंतु मला संवय

नसल्यामुळें मला मांस खाण्याची किळस येते."—फॅराम्प्टन साहेबांनीं माझ्या म्हणण्याला दुजोरा दिला.

या शाळेंत अंधशिक्षणशास्त्राचा अध्यापक वर्ग आहे. युरोप व आशियांतील अंधशाळांना शिक्षक पुरविणें आणि अंधांच्या शिक्षण-शास्त्रावर आंतरराष्ट्रीय ऐक्यता घडून आणणें वगैरे उद्देश या वर्गाचे आहेत. पदवीधर शिक्षकांना येथील शिक्षणकालांत शिष्यवृत्ति दिली जाते. फक्त दोघां भारतीयांनीं या शिक्षणाचा फायदा घेतला आहे असें मला कळालें.

फॅराम्प्टनसाहेबानीं आपले मोठमोठे ग्रंथ व कित्येक लहान लहान पुस्तकें मला भेट म्हणून दिलीं. आभारपूर्वक त्यांचा व शिक्षकवर्गाचा निरोप घेऊन मी तेथून माझ्या हॉटेलमध्यें आलों व दुसऱ्या दिवशीं ज्या संस्थांना भेट द्यावयाची होती त्यांना फोन करून वेळा ठरवून ठेवल्या.

---

# प्रकरण २२ वें

अमेरिकन फाउंडेशन फॉर दि ब्लाईंड हीं न्यूयॉर्क शहरांतील चाल-विलेली संस्था आज तीस वर्षे काम करीत आहे. या संस्थेचे उत्साही संचालक डॉ. रॉबर्ट आर्विन आहेत. हे जन्मांध असून एम्. ए., एलूएलू. डी. ही उच्च पदवी त्यांनीं मिळविली आहे. त्यांचें सध्या वय सत्तर वर्षांचें आहे. अमेरिकन अंधांच्या हितसंरक्षणार्थ गेल्या अर्धशतकांत यांनीं जी कामगिरी केली आहे ती सर्वमान्य झाल्यामुळें त्यांना 'अमेरिकन अंधांचे पिता' अशी संज्ञा प्राप्त झाली आहे.

मी ज्या वेळेस त्यांना भेटण्यास गेलों त्या दिवशीं मुसळधार पाऊस पडत होता. परन्तु भेटीची वेळ ठरल्यामुळें आसरा धरून कोठें तरी कसा थांबूं? माझ्याप्रमाणेंच न्यूयॉर्क शहरवासीयांच्या कामाच्या वेळा ठरल्या-

मुळें कित्येक स्त्रीपुरुष तसेच भिजत चालले होते. रस्त्यावर मोटारींची रीघ लागलेली, पण मला एकही मोटार मिळेना. सर्वच भरलेल्या व पावसाच्या माऱ्यांत घाईनें जाणाऱ्या. यामुळें वरील संस्थेंत जाण्यास मला पंधरा मिनिटें उशीर झाला. याची जाणीव डॉ. राबर्ट अर्विनसाहेबानें मला दिलीच. या वृद्ध गृहस्थांच्या डोळस सेक्रेटरी शेजारीच बसल्या होत्या. हस्तांदोलन करून दोघांनींही माझें स्वागत केलें. भारतीय अंध सस्थेबद्दल त्यांनीं मला माहिती विचारली. भारतीय सरकारनें यांचा सल्ला घेण्याकरितां एक पत्र पाठविलें होतें. भारतांत ब्रेल छापखाना व अंध शिक्षणास लागणारीं उपकरणें तयार करण्याचा कारखाना काढण्याकरितां खर्चाचें अंदाजपत्रकहि त्यांनीं मागविलें आहे, असें त्यांनीं मला सांगितलें. डॉक्टर साहेब पुढें म्हणाले—"अशा मोघम पत्राचें उत्तर मी देऊं शकणार नाहीं. तुम्ही किती भांडवल गुंतविणार व कारखाना किती मोठ्या प्रमाणांत काढणार हें प्रथम मला कळवा." असें म्हणून भारतसरकारचें पत्रहि त्यांनीं मला दाखविलें. मला या बाबतींत कांहींच माहित नसल्यामुळें मी काय उत्तर देणार ?

डॉक्टर साहेबांनीं आपल्या संस्थेची मला संपूर्ण माहिती दिली. या संस्थेच्या प्रयत्नानें केंद्रीय सरकारनें अंध हितसंरक्षणार्थ बरेच कायदे पास केले आहेत. प्रौढ अंधांना विनामूल्य ब्रेलग्रंथ पुरविणें, आगगाडी व बसमध्यें सवलतीच्या दरानें प्रवास करणें, अंधांनीं चालविलेल्या कारखान्यांत तयार झालेला माल सरकारनें विकत घेणें, आपद्ग्रस्त अंधाला आर्थिक मदत देणें, वैद्यकीय सल्ला व मदत विनामूल्य देणें, पदवीधर व कलाविशारद अंधांना सरकारी नोकरींत डोळस उमेदवारापेक्षां जास्त पसंत करणें, प्राप्तीवरच्या कराची सूट वगैरे कायदे डॉ. राबर्ट अर्विन साहेबांनीं पास करून घेतले आहेत. डॉक्टर साहेबांच्या हुकुमावरूनच 'बोलके ग्रंथ' तयार करण्याचा कारखाना मला दाखविण्यांत आला. कच्च्या मालापासून फोनोच्या प्लेटी कशा तयार करितात आणि ग्रंथांचें वाचन होत असतांना रिकॉर्डिंग कसें केलें जातें याचें

प्रात्यक्षिक मला दाखविण्यांत आलें. यानंतर या कारखान्याच्या संशोधन विभागाला मीं भेट दिली. मास्टर ऑफ सायन्स पदवी धारण करणारे अंध संशोधकांनीं लहानमोठ्या यंत्रांची व उपकरणांची मला माहिती दिली. कृषि व स्थापत्यशास्त्राचें शिक्षण घेण्यास अंधांना सोयीस्कर पडतील अशीं हीं उपकरणें आहेत. जमिनीचा सपाटपणा व खालवरपणा अंधांना कसा मोजतां येईल याचा विचारहि येथील मंडळी करीत आहेत. अंधांना वापरण्याकरितां पांढरी काठी या लोकांनीं



लेखक अंध शेतकऱ्याकरितां तयार केलेल्या शेतांत मशीन चालवितांना

तयार केली आहे. अंधांनींच पांढरी काठी वापरावयाची असा येथें कायदेशीर दंडक आहे. या काठ्या अनेक प्रकारच्या असतात. परंतु या संस्थेंतील पांढऱ्या काठीचे विशेष गुण आहेत. वरच्या बाजूला आंगठ्याएवढी जाड व निमुळती होऊन खालीं करंगळीएवढी झालेली ही ॲल्युमिनियम् धातूची काठी आहे. मुठीजवळ असलेली एक कळ दाबल्यास ही काठी वीतभर लांब होते, त्यामुळें ती आपल्या खिशांत सहज ठेवतां येते. ही काठी रात्रीं वापरीत असतां, ड्राय बॅटरीवर

चालणारा लाल दिवा तिच्या खालच्या टोंकाला लागतो. यामुळें अ
काठी धरणारा मनुष्य अंधळा आहे असें लोकांना समजतें. अमेरिवें
पांढऱ्या काठीचा प्रताप फार मोठा आहे. ही काठी घेऊन रस्ता ओलांडं
असतांना रस्त्यानें दोन्ही बाजूनें होत असलेली प्रचंड मोटारींची वाहत
बंद पडते. इतकेंच काय अमेरिकेच्या प्रेसिडेंटची गाडी सुद्धां अंध मनु
रस्ता पार करीपर्यंत थांबते अशी एक आख्यायिका आहे. अंधांनीं
काठी कशी वापरावी यावर अनेक पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. 'व्हा
स्टिक' नांवाचें एक मासिकपत्रहि प्रसिद्ध आहे.

अंध व डोळस संशोधकांनीं संशोधित केलेल्या अनेक वस्तूंचें निरीक्ष
केल्यावर या संस्थेचें ब्रेल ग्रंथसंग्रहालय मीं पाहिलें. अंधांकरितां ब्रे
टाइपरायटर तयार करण्याचा कारखाना मीं पाहिला. डॉ. रॉबर्ट अवि
हे अंध असून सुद्धां यांनीं आपल्या कार्याचा व्याप इतका वाढून घेत
आहे कीं, यांना मदत करण्यास हाताखालीं दहा सेक्रेटरीज् आहे
'अमेरिकन असोसिएशन फॉर ओव्हरसीज ब्लान्इड' ही संस्था त्यां
नुकतीच स्थापन केली आहे. या संस्थेचे ते अध्यक्ष आहेत. अमेरिकेच
बाहेर असलेल्या जगांतील सर्व अंधांच्या हिताकरितां प्रयत्न करणारी
संस्था आहे. भारतीय अंधांच्या परावलंबी व अनुकंपनीय स्थिती
जाणीव डॉक्टरसाहेबांना आहे. ते मला म्हणाले—"भारतीय अंध पद
धरांना उच्च शिक्षणाकरितां तुम्ही इकडे पाठवा, त्यांच्या शिक्षणाचा
इतर खर्च मी देईन. भारतीय अंध लोकांना धंदेशिक्षण देण्याकरि
एक मिलियन डॉलर मी देण्यास तयार आहें."

रॉबर्टसाहेब हे तीनचार मासिकांचे संपादक आहेत. हैदराबादच
अंधशाळेकरितां यांचें आंतरराष्ट्रीय प्रसिद्ध मासिक 'Outlook for t
Blind' पाठविण्यास मीं सांगितलें.

डॉक्टरसाहेबांनीं अत्यन्त आस्थेनें आपली संस्था मला दाखवित
निरोप घेण्याच्या वेळेस दोनचार मुख्याधिकारी माझ्याबरो
होते. नंतर समजलें कीं, डॉक्टरसाहेबांची पत्नी दिवंगत होऊन तीन

दिवस झाले होते. चाळीस वर्षांच्या सहवासानंतर डॉक्टरसाहेबांना हा पत्नीवियोग असह्यच खरा ! पण कर्तव्यपरायण डॉक्टरसाहेब नियमितपणें संस्थेंत येऊन काम करीत. माझ्या तीन चार तासांच्या सहवासांत त्यांनीं मला त्यांच्या दुःखाची थोडीशीही जाणीव करून दिली नाहीं.

डॉक्टरसाहेब पुढें मला दोनचारदां भेटले. माझ्या आवाजावरून ते चटकन् माझ्या नांवानें हांक मारून बोलावीत असत व कुशल समाचार विचारीत. डॉक्टरसाहेबांच्या सांगण्यावरून व केंद्रीय सरकारच्या मार्गदर्शनाप्रमाणें मीं एके दिवशीं अंध औद्योगिक केन्द्राला भेट दिली. ही संस्था न्यूयॉर्क शहराच्या ब्रुक्लिन विभागांत आहे. या संस्थेला ब्रुक्लिन इंडस्ट्रियल होम फॉर दी ब्लाईड असें म्हणतात. या संस्थेचे दोन भाग आहेत. एक शाखा प्रौढ अंधांना धंदेशिक्षण देणारी व दुसरी शाखा त्यांना



एक आंधळी मुलगी भारतास घेऊन जाण्याचा हट्ट धरते.

कामाला लावून वेतन देणारी. या ठिकाणीं मीं एक आठवडा राहून कामाचें निरीक्षण केलें. या संस्थेचे बोर्ड ऑफ डायरेक्टर्सचे सभासद व कारखान्याचे कामगारही आंधळे आहेत. या पांचशें लोकांच्या समूहांत दहापंधरा डोळस कामकरी असतील. या संस्थेचे अध्यक्ष डॉ. साल्मन हे अर्थात् अंधच

आहेत. हे पदवीधर कायदेपंडित अंधहितसंरक्षणार्थ स्थापन झालेल्या सरकारी कायदेमंडळाचे अध्यक्षहि आहेत. मी तेथें गेल्यावर अंध अधिकाऱ्यांनीं हस्तांदोलन करून माझें स्वागत केलें. पहिला प्रश्न त्यांनी मला विचारला — ‘काय हो मिस्टर राव, तुम्ही आम्हाला प्रथम सांगा, तुम्ही आंधळे आहांत कां ?’ मीं उत्तर दिलें— ‘मला वाईट वाटतें कीं, मी आंधळा नाहीं.’ —

ते परत मला म्हणाले—‘ जर तुम्ही आंधळे नाहींत तर आमच्या कारखान्यांत तुम्ही काय पाहणार ?’

माझ्या डोळसपणावर त्यांनीं घेतलेला आक्षेप कांहीं अंशीं बरोबर आहे असें मला वाटलें. अत्यंत गुंतागुंतीचीं यंत्रें चालवितांना अंध लोक कशी काळजी घेतात आणि दृष्टीशिवाय इतर इंद्रियांनीं व कर्मेंद्रियांनी ते चोख काम कसें करतात हें वरवर दृष्टि फेकणाऱ्या आम्हां डोळसांना काय कळणार ?



अंध–व्यवसाय–केंद्र, ब्रुक्लिन. दोघेही अंध डायरेक्टर्स आहेत.

या संस्थेच्या डायरेक्टर्सच्या मध्यभागीं बसून माझा फोटो घेण्यांत आला. त्यावेळेस ‘ ब्रुक्लिन् ईगल ’ वर्तमानपत्राचे प्रतिनिधी हजर होते.

त्यांनीं फोटो काढून माझी मुलाखत घेतली. दुसऱ्या दिवशीं 'ईगल' मध्यें हें सर्व प्रसिद्ध करण्यांत आलें.

या अंध औद्योगिक कारखान्यांत मुख्यतः रबराच्या ' डोअर मॅट्स (पायपुसणीं) तयार होतात. बस व मोटारचे वापरलेले टायर्स यंत्रानें येथें कापले जातात. नंतर यांत्रिक दाबानें या तुकड्यांना सपाट करण्यांत येतें. हे तुकडे समूहानें एका यंत्रांत जातात व दुसऱ्या बाजूनें लहान व सारख्या आकाराचे तुकडे बाहेर पडतात. अर्धा इंच जाड व एक इंच लांब अशा तुकड्यांना भोकें पाडून जाड पोलादी तारेंत विणून लहान–मोठ्या आकाराचे डोअर मॅटस् ( पायपुसणीं ) तयार करतात. विशिष्ट काम करीत असलेला आंधळा मनुष्य आयुष्यभर तेंच काम करण्यास योग्य असतो. त्यांचें वेतन दररोजच्या कामाच्या प्रमाणावर अवलंबून असतें. निरनिराळ्या पेठेंत राहणारे हे अंध बरोबर आठ वाजतां कामाला येतात व लंचचा एक तास सोडून ठीक पांच वाजेपर्यंत अत्यंत मेहनतीनें काम करतात. यांची प्रत्येकीं मासिक मिळकत २५० – ४०० रु. असते.

दोन दोन तासांनंतर या अंधकामगारांना दहा मिनिटें आरामाकरितां मिळतात. या आरामाच्या खोल्या कारखान्याच्या दोन्हीं बाजूला आहेत. येथें मऊ कोचेस व पलंगहि आहेत. अशा खोलींत येऊन कोणीहि गप्पा मारीत नाहींत. विश्रांति घेऊन घंटा होतांच चटकन् उठून ते आपल्या जागेवर जाऊन उभे राहतात व कामाला सुरुवात करतात. कारखान्यांतील अनेक यंत्रांच्या संमिश्र आवाजाला मागें सारून कर्णमधुर असे वाद्य-संगीताच्या पेट्यांतून येणाऱ्या नादांच्या तालांत या अंधांचें काम चालू असतें. जीवन सुखमय होण्याकारितां आठवड्यांतून एकदां करमणुकीचे कार्यक्रम केले जातात. या लोकांचें स्वतःचें थिएटर आहे. तेथें नृत्य व सामाजिक समारंभ नेहमीं होतात. अशा आनंदी वातावरणांत कांहीं दिवस राहून मीं या सर्वांचा निरोप घेतला.

* * *

मूकांच्या शिक्षणास इ. स. १५५५ मध्यें पेड्रो पॉनस डी लिऑननें स्पेनमध्यें प्रथमतः सुरुवात केली. हळूहळू युरोपच्या सर्व राष्ट्रांत मूकांच्या शिक्षणसंस्था निघाल्या. अमेरिकेंत पहिली बहिऱ्या-मुक्यांची शाळा कनेक्टिकट राज्यांतील हार्टफोर्ड शहरीं १५ एप्रिल १८१७ सालीं स्थापन झाली. गेल्या १३५ वर्षांत मुक्यांकरितां खाजगी व सरकारी अशा अनेक शिक्षणसंस्था निघाल्या आहेत. सरकारी मूकशाळेमध्यें शिक्षणाचा व वसतिगृहाचा खर्च पूर्णपणें सरकारच करितें.

अमेरिका व हिंदुस्थान यांचे तुलनात्मक आंकडे:—

| **अनुक्रम** | **अमेरिका** | **हिंदुस्थान** |
|---|---|---|
| (१) मूक लोकसंख्या | ७८००० | २,००,००० |
| (२) मूकांकरितां शिक्षणसंस्था | २१० | ३५ |
| (३) शाळेंत शिकणारे मूक विद्यार्थी | २०,५०० | १३१३ |
| (४) मूकशाळेंतील शिक्षकसंख्या | ३००० | १२० |
| (५) एका मूकास शिकविण्यास लागणारा वार्षिक सरासरी खर्च | तीन हजार रुपये | उपेक्षणीय |
| (६) प्रत्येक प्रौढ मूकाची सरासरी वार्षिक मिळकत. | पांच हजार रुपये | बरेच भिकारी आहेत, मिळकत उपलब्ध नाहीं. |

मुलें मुकीं कां होतात याचें उत्तर म्हणजे त्यांना कोणताहि आवाज ऐकूं येत नाहीं म्हणून. बहुतेक बहिरे मूल मुकें होतेंच. ज्यांना बोलतां येतें पण जे अर्धवट बहिरें असतात त्याकरितां शिक्षणाची व्यवस्था निराळी असते. मुक्यांना शिकविण्याच्या पद्धतींत 'Oral method' ही सर्वमान्य झाली आहे. बोलण्यास समर्थ करणें व दुसरे काय बोलतात हें आपल्या दृष्टीनें जाणणें या दोन मुख्य गोष्टी मूकांना शास्त्रीय पद्धतीनुसार अमेरिकेंत शिकविल्या जातात. याशिवाय त्यांना धंदेशिक्षणहि दिलें जातें. यांच्या शिक्षणाचा काल १२ ते १५ वर्षांचा असतो.

न्यूयॉर्क, नॉर्थाम्प्टन, डेट्रॉयट, फ्लिंट, सेंट लुई, जॅक्सनव्हील, रॅले, वॉशिंग्टन वगैरे मोठमोठ्या शहरांतील अनेक मूकांच्या शाळेचें मीं निरीक्षण केलें. कांहीं शिक्षणसंस्थांनीं आपल्या संशोधनाकरितां आंतरराष्ट्रीय प्रसिद्धीहि मिळविली आहे. 'Central Institute for the Deaf, St. Louis' येथें जेव्हां मी गेलों, तेव्हां त्या शाळेला सुट्टी होती, तरी पण तेथील मुख्य अध्यापक डॉ. सिल्वरमननें मूक-बधिर शिक्षणाच्या सर्व शाखा मला दाखविल्या. नंतर आम्ही सशोधन खात्यांत गेलों. तेथें एका "Sound-proof" खोलींत एका टेबलावर एका जिवंत डुकरावर प्रयोग चालू होते. तिघे संशोधक—दोघे जर्मनींचे व तिसरे बेल्जियमचे डॉक्टर—आपल्या शेजारीं फिरत असलेल्या वाटोळ्या पात्रावर एका कांट्यानें निघत असलेल्या रेषांचा अभ्यास करून निष्कर्ष काढीत होते. या नाजूक कांट्यांचा संबंध निरनिराळ्या केंसासारख्या बारीक तंतूनें डुकराच्या अंतरकानांतील मज्जातंतूस जोडण्यांत आला होता. डुकराच्या कानापाशीं केलेल्या चढउतार आवाजानें त्याच्या अंतर—कानांतील मज्जातंतूनें होणाऱ्या स्पंदनाची प्रतिक्रिया वर सांगितलेल्या वाटोळ्या पात्रावर होत असे; तसेंच कानामध्यें व कानाच्या आसपास असलेल्या हाडावर आवाजाचा आघात होत असतांना व पूर्ण स्तब्धता असतांना काय परिणाम होतो, तो त्या त्या भागांतील हाडांचे तुकडे योग्य वेळेस कापून त्याचें पृथक्करण करून दुर्बिणींतून परीक्षा करावयाची. मी डॉ. सिल्वरमनला म्हणालों— "संशोधनाच्या फार खोल पाण्यांत मला नेऊं नका, मला फक्त या संशोधनाचीं आधारभूत तत्त्वें सांगा."

त्यांनीं मला सर्व कांहीं व्यवस्थित समजावून सांगितलें. नंतर आम्ही ऑफिसमध्यें जाऊन बसलों. मला चहापार्टी झाली. डॉ. सिल्वरमननें हिंदुस्थानांतील जातिभेद, बालविवाह, निरक्षरता, दारिद्र्य वगैरे विषयांवर मला माहिती विचारली. त्यांच्या बोलण्यावरून हिंदुस्थानच्या संस्कृतीबद्दल त्यांना बरीच विकृत माहिती मिळाली आहे असें मला वाटलें.

मूकांच्या शिक्षणसंस्थेंत वॉशिंग्टन येथील गॅलेडेट कॉलेज अग्रगण्य

आहे. मूकांकरितां जगांत दुसरीकडे कोठेंहि कॉलेज नाहीं. हें कॉलेज इ. स. १८६४ साली अमेरिकन कॉंग्रेसच्या कायद्यानुसार स्थापिलें गेलें. येथील डीन आर्विन फुसफील्ड हे थोडक्याच दिवसांत माझे स्नेही झाले. पहिल्या भेटींतच परराष्ट्रांतील माणसाचें अंतःकरण आपल्याकडे ओढून घेण्याची कला त्यांना चांगली अवगत होती. मी ज्या दिवशीं त्यांच्या घरीं गेलों त्या दिवशीं फारच उकाडा होता. मी त्यांच्या खोलींत प्रवेश करितां क्षणींच त्या वृद्ध डीनसाहेबांनीं माझें हस्तांदोलन करून स्वागत केलें. माझा कोट स्वतः त्यांनीं काढून घेतला व व्यवस्थित रीतीनें घडी घालून तो टेबलावर ठेविला. आठच दिवस मी त्यांच्या घरीं होतों, परन्तु त्यांच्या सहवासांत मी त्यांच्या कुटुंबांतील एक घटक झालों. यांच्या पत्नी धंद्यानें डॉक्टर आहेत. या पतिपत्नींनीं गांधी तत्त्वज्ञानाचा सखोल अभ्यास केला आहे.

गॅलेडेट कॉलेजचा अभ्यासक्रम इतर कॉलेजच्या अभ्यासक्रमाप्रमाणेंच आहे. सध्यां विद्यार्थ्यांची संख्या तीनशें आहे. मूकांना प्राथमिक शिक्षणापासून बोलण्याची कला शिकवीत असल्यामुळें ते कालांतरानें बोलूं शकतात म्हणून इकडील मूकशिक्षणसंस्थांना बहिऱ्यांची शाळा म्हणतात. 'गॅलेडेट कॉलेज फॉर दि डेफ' या नांवानेंच हें कॉलेज ओळखलें जातें.

मी एके दिवशीं एम्. ए. च्या वर्गांत जाऊन बसलों. सुमारें चाळीस विद्यार्थी ( मुलें व मुली ) प्रोफेसरसाहेबांचें व्याख्यान पाहात होते, ( ते सर्वच बहिरे असल्यामुळें ऐकण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं ) व आपल्या वहीमध्यें टिपणें उतरून घेत होते. प्रोफेसरांच्या गालाच्या, ओठाच्या, जिभेच्या हालचालीवरून विद्यार्थी भाषा समजत असत. याशिवाय ते प्रोफेसर Manual alphabet मध्यें सुद्धां तरबेज असल्यामुळें आपल्या भाषेच्या वेगाबरोबर उजव्या हाताच्या बोटांच्या निरनिराळया आकृत्या करून व्याख्यान देत होते. त्यावेळेस नागरिकशास्त्र हा विषय चालूं होता. "विवाहकार्य रजिस्टर न करितां चर्चमध्यें उरकून घेतल्यास संतति कायदेशीर मानली जाणार नाहीं, चर्चमध्यें न जातां रजिस्ट्रेशननें लग्न झाल्यास

संतति कायदेशीर मानली जाते. चर्चमध्यें जाणें वा न जाणें हें प्रत्येक व्यक्तीच्या मनावर अवलंबून आहे, परन्तु रजिस्ट्रेशन अवश्यक आहे,"–



मूक कॉलेजांतील मूक मुली, वाशिंग्टन



मूक कॉलेजांतील मूक विद्यार्थी, वाशिंग्टन
डीन अर्विन फुसफील्ड व लेखक

वगैरे वगैरे बरेंच व्याख्यान तो देत होता. हिंदु विवाहपद्धतीबद्दल मूक विद्यार्थ्यांनीं मला बरेच प्रश्न विचारले. कॉलेजच्या आवारांत मी विद्यार्थ्यांबरोबर खेळ खेळत असतांना त्यांनीं हिंदी खेळ शिकण्याची हौस दर्शविली. मी त्यांना 'खो खो' च्या खेळाची माहिती दिली व नंतर आम्ही तो खेळ खेळलोंहि. मुख्य गोष्ट म्हणजे कॉलेजचे डीनसाहेबांनींहि—अर्विन फुसफील्ड—आमच्यामध्यें अत्यंत उत्साहानें भाग घेतला. येथें बहिऱ्यामुक्यांना शिकविणारे शिक्षक तयार करण्याचे वर्ग आहेत. हे आंतरराष्ट्रीय वर्ग असल्यामुळें सर्व राष्ट्रांचे विद्यार्थी येथें आढळून येतात. कलकत्ता मूकविद्यालयाचे मुख्याध्यापक श्री. शैलनाथ बानर्जी हे याच कॉलेजचे एम्. ए., पीएच्. डी. आहेत.

योग्य शिक्षण घेऊन मुके लोक निरनिराळया धंद्यांत गुंतलेले दिसून येतात. बारा वर्षांपूर्वी एका मुक्यानें २५० डॉलर भांडवल घालून मोटारीचे नटस् तयार करण्याचा धंदा सुरू केला. आज त्याचें भांडवल एक कोटीवर असून त्याच्या कारखान्यांत एक हजारावर कामगार आहेत. या कामगारांपैकीं ९० टक्के कामगार मुके आहेत. केंद्रीय सरकारच्या शिक्षणखात्यांतील एका शाखेचे मुख्य अधिकारी मिस्टर वुइल्यमस् बॉईस हे जन्मत: बधिर व मूक आहेत. परन्तु ऑफिसच्या कामांत ते निष्णात समजले जातात. अंध, मूक व बधिर असा एक गृहस्थ तांबटाचा धंदा करीत असलेला मीं पाहिला. हातोडीनें पत्रा बडवून तो फुलदाण्या करीत होता. अशाच प्रकारचा दुसरा गृहस्थ कॅन्सस राज्याच्या एका खेड्यांत शेतकीचा धंदा करीत होता. सारांश, कोणतेंहि शारीरिक व्यंग मनुष्याच्या मिळकतीमध्यें अडथळा आणणार नाहीं, अशी व्यवस्था येथील सरकारनें केली आहे. लोकराज्यांत कोणत्याहि प्रकारची सक्ति होता कामा नये असें हिंदुस्थानांत लोक म्हणतात; परन्तु अमेरिकेसारख्या श्रेष्ठ अशा लोकसत्तात्मक राज्यांत मूल शिक्षणाशिवाय राहिल्यास आईबापावर कायदेशीर इलाज केला जातो, इतकेंच नव्हे तर, त्या त्या कौंटींतील मॅजिस्ट्रेटस्ना, यामध्यें लक्ष न घातल्यास, आपली जागा सोडून खालीं उतरावें लागतें.

---

# प्रकरण २३ वें

न्यूयॉर्क शहरांतून अमेरिकेच्या अंतर्भागांत प्रवास करावयाचा झाल्यास दोन मोठ्या स्टेशनांवरून बाहेर पडावें लागतें. ग्रँड सेंट्रल स्टेशन व पेन्सिल्वानिया हीं स्टेशनें शहराच्या मध्यवस्तींत आहेत. या दोन्ही स्टेशनांच्या आंत व बाहेर मोठमोठीं दुकानें असल्यामुळें आपण एका मोठ्या बाजारांत आलों असें वाटतें. स्टेशनचा मुख्य भाग भूपृष्ठापासून बराच आंत असल्यामुळें आंत जाण्यास बरेच रस्ते आहेत. बाहेरच्या सपाट रस्त्यावरून जाणाऱ्या मोटारी स्टेशनच्या उतरणीच्या रस्त्यांतून भुयारांत सहज गडप होतात व प्रवाशांना घेऊन दुसऱ्या भुयारांतून लागोपाठ बाहेर पडतात. मुंगळ्यांचे थवे ज्याप्रमाणें भोंकांतून बाहेर पडतात त्याप्रमाणें या मोटारी पाताळांतून हजारोंनीं बाहेर येतांना दिसतात. फिरते जिने, साधे जिने, उतरणीच्या लहान लहान वाटा व लिफ्टस् अशा अनेक साधनांनीं आपल्याला स्टेशनच्या मुख्य भागाकडे जातां येतें. पन्नास एक पायऱ्या उतरल्यावर आपण एका मोठ्या हॉल-मध्यें येतों. या हॉलच्या मध्यभागीं चौकशी कचेरी आहे. या वर्तुळाकार चौकशी कचेरींत वीस पंचवीस रेल्वेचे ऑफिसर्स ( या बहुतेक स्त्रियाच असतात ) प्रवाश्यांना जरूर ती माहिती देतात. गाडी सुटण्याची किंवा येण्याची वेळ, कोणत्या नंबरच्या दरवाजांतून कोणत्या नंबरच्या प्लॅटफॉर्मवर जावयाचें वगैरे माहिती देऊन एक छोटासा रेल्वेचा नकाशा व वेळापत्रकहि विनामूल्य आपल्याला देण्यांत येतें. ठिकठिकाणीं लावलेल्या लाऊड स्पीकरनें जाहीर केलें जातें — ' अटेन्शन प्लीज '. कृपा करून इकडे लक्ष द्या असें म्हणून अमक्या नंबरच्या प्लॅटफॉर्मवर अमक्या गांवाकडे जाणारी गाडी ठीक दहा मिनिटांनीं सुटेल. वाटेंत लागणाऱ्या मुख्य मुख्य गांवांचीं नांवेंहि सांगितलीं जातात.

प्लॅटफॉर्मवर जाण्याकरितां जे दरवाजे असतात ते नेहमीं बंद असतात. सुटण्याच्या आधीं दहा मिनिटें ते उघडले जातात. उतारू एका

रांगेनें आंत जातांना तिकिटें तपासलीं जातात. प्लॅटफॉर्मवर फक्त उतारूंना जाऊं देतात. पोहोंचविण्यास आलेली मंडळी वेटिंगरूमपर्यंतच येऊं शकतात. प्लॅटफार्म तिकिटाची पद्धत इकडे नाहीं.

वेटिंगरूमस् अत्यन्त स्वच्छ असतात. सर्वच उतारू एकाच वर्गाचें असल्यामुळें कुठलाच भेदभाव येथें आढळत नाहीं. मेनसूरूम व वुइमेन्स-रूम म्हणजे पुरुषांकरितां व स्त्रियांकरितां खास खोल्या वेटिंगरूमच्या दोन्ही बाजूला असतात. मेनसूरूममध्यें आपण गेलों म्हणजे आपल्याला बऱ्याच सोई दिसून येतात. बूट पॉलिश करणारे एका रांगेंत बसलेले, केशकर्तन करणारे हातांत विजेचीं कर्तनयंत्रें घेऊन उभे असलेले व आपल्या अंगावरील सूटसूचे कपडे पांच मिनिटांत स्वच्छ आणि इस्त्री करून देणारे परीट उतारूंच्या सेवेला तयार असतात.

उभे राहून तोंड धुण्याकरितां ओळीनें पुष्कळ बेसिनस् भिंतींत बसविलेलीं असतात. ऊन व थंड पाण्याचे दोन नळ यांत सोडलेले असतात. एका बाजूला शौचमुखमार्जनाची सोय तर दुसऱ्या बाजूला स्नानाची सोय असते. स्नानाकरितां बंदिस्त अशा लहान लहान बाथरूमस् आहेत. टॉवेल व साबण तेथें ठेवलेलें असतें. ऊन अथवा थंड पाण्यानें शॉवरबाथ किंवा टब् बाथ आपण घेऊं शकतों. सारांश, प्रवासाचा सर्व शीण नाहींसा होऊन आपण अत्यंत ताजेतवाने व प्रफुल्लित मनानें 'मेनस्' रूमच्या बाहेर पडतों. वेटिंगरूमच्या एका बाजूला उपाहारगृह असतें. निरनिराळ्या ताज्या फळांपासून काढलेल्या अनेक रंगाचे रस गोल कांचेच्या भांड्यांत भरून ठेवलेले असतात. इतर खाण्याचे पदार्थहि येथें भरपूर मिळतात.

ग्रँड सेंट्रल स्टेशनएवढें मोठें स्टेशन जगांत दुसरें नाहीं. या स्टेशनची इमारत पंचाहत्तर एकर जमिनीवर पसरली आहे. या स्टेशनचे सत्तरवर प्लॅटफॉर्मस् आहेत आणि ते सर्व खोल तळघरांत लपलेले आहेत. या प्लॅटफार्मसूवर रोज येणाऱ्या पॅसेंजर गाड्यांची संख्या सुमारें दीड हजार आहे. या स्टेशनचें ब्रीदवाक्य—'इच्छित वस्तु प्राप्त करून देणारें समृद्ध राष्ट्र'—असें आहे.

पेन्सिल्वनिया स्टेशनचा अंतर्भाग अत्यंत सुंदर आहे. याची वेटिंगरूम वैभवशाली राजाचा दिवाणखानाच आहे. हीं दोन्हीं स्टेशनें बांधण्यास प्रत्येकीं सुमारें चाळीस कोटी रुपये खर्च आला. या स्टेशनवरून दर ताशीं एक याप्रमाणें दिवस व रात्र मिळून चोवीस गाड्या वॉशिंग्टनला जातात. हें स्टेशन माझ्या हॅटेलपासून सुमारें तीन फर्लांग असल्यामुळें सूटकेस हातांत घेऊन मी तेथें चालत जात असे. एकदां वजनदार सूट-केस आलटून पालटून हातांत घेऊन घाईनें स्टेशनवर मी चाललों होतों. एक गरजू अमेरिकन विद्यार्थी माझ्याजवळ आला व म्हणाला—'मी आपली बॅग घेऊन स्टेशनवर येतों.' माझी बॅग देण्याची तयारी होतीच. टाय व सूटनें व्यवस्थित पोशाख केलेल्या या कॉलेज तरुणाला मीं योग्य मोबदला दिला व त्याचे आभार मानून मीं निरोप घेतला.

वेटिंगरूमच्या एका बाजूला तिकिट ऑफिस आहे. येथें सुमारें वीस खिडक्यांतून तिकिटें दिलीं जातात. मीं कधींच तिकीट विकत घेतलें नाहीं. संयुक्त राष्ट्राचा प्रवासपरवाना दाखविल्यावर मला रेल्वेपास मिळत असे. परंतु तिकीट विकत घेणाऱ्या लोकांबरोबर मला रांगेंत उभें रहावें लागे.

पास घेऊन इतर उतारूंबरोबर एकदोन तळघरें उतरून चालत गेल्यावर मला आगगाडीचें दर्शन झालें. याचें इंजिन पाहिल्यावर हिंदुस्थानांतील इंजिनें लहान मुलांचीं खेळणीं वाटतात. एक डबा म्हणजे लांबच लांब बोगी असते. या बोगीच्या दोन टोंकाला दोन दरवाजे अस-तात. डब्याला मध्येंच कोठें दरवाजा नसतो. प्रत्येक डब्यांत एक कंडक्टर असतो. गाडी सुटण्यापूर्वीं हा दरवाज्यांत उभा असतो. स्त्रियांचें सामान घेऊन वर चढण्यास मदत करतो. दोघे उतारू व्यवस्थित व आराम-शीर बसतील असे. स्प्रिंगचे कोचेस् जोडीनें या डब्यांत ठेवलेले असतात. एका बॅगशिवाय जास्त सामान घेऊन कोणीच प्रवास करीत नसल्यामुळें सामानाची गर्दी नसते. हे डबे एअर कंडिशन्ड असल्यामुळें बाहेरच्या शीतोष्णाचा मागमूसहि उतारकरूंना होत नाहीं. बाहेरचे देखावे बघण्या-करितां कांचेच्या खिडक्या आहेत. परंतु खिडक्या उघडतां येत नाहींत

बाहेरचा उजेड आपल्याला नको असल्यास खिडकीवर असलेला काळा पडदा खालीं ओढावा. गाडीचा वेग ताशीं सुमारें साठ ते सत्तर मैल असतो.

गाडी चालू असतांना मेवामिठाई विकणारे गळ्यांत खाद्यसामानाचें एक खोकें अडकवून फिरत असतात. हे न ओरडतां मुकाट्यानें प्रत्येका-जवळ सामान दाखवीत हिंडतात. आपण कोणताहि पुडा घ्यावा व पुड्यावर लिहिलेली किंमत मुकाट्यानें त्यांच्या डब्यांत टाकून द्यावी. हेच फेरीवाले वापरलेले डबे, कागदांचे तुकडे वगैरे केरकचरा गोळा करून घेऊन जातात.

न्यूयॉर्क शहरांतून गाडी निघाली म्हणजे पंचवीस मैलपर्यंत भूगर्भांतूनच जाते. नंतर पृष्ठभागावर येते. परन्तु तीस फूट उंच असलेल्या पुलावरून ही गाडी जाते. जमिनीवरील मोटारींना हा अडथळा होऊं नये म्हणून ही व्यवस्था केलेली आहे. हा पूल जवळ जवळ तीनचार मैल लांब आहे. अशा पुलावरून गाडी जातांना न्यूयॉर्क शहराच्या आसमंतांत असलेल्या घरांचीं छपरें दिसतात.

न्यूयॉर्क ते वॉशिंग्टनचा प्रवास चार तासांचा आहे. वाटेंत लहान-मोठीं स्टेशनें आहेत. अमेरिकेंतील दोन स्टेशनमधील अंतर पंधरावीस मैल असतें. स्टेशनचीं नांवें लिहिलेल्या पाट्या कोठेंच दृष्टीस पडत नाहींत. गाडी स्टेशनवर येत असतांनाच एखादा पोर्टर स्टेशनचें नांव मोठ्यानें ओरडतो. प्रत्येक डब्यांतील कंडक्टर आपल्या डब्यांतील उतारू कोठें जाणार आहे हें जाणतो व स्टेशन येण्यापूर्वी दहा मिनिटें त्यांना आगाऊ सूचनाहि तो देतो. हा कंडक्टर पोर्टर नसून एक रेल्वेचा ऑफिसरच असतो. याचा पोषाख म्हणजे काळी पँट, काळा कोट, काळा टाय व काळी टोपी असा असतो.

चार तासांनंतर मी वॉशिंग्टनला पोहोंचलों. बॅग घेऊन मी स्टेशनच्या बाहेर आलों. एक पोलिस ऑफिसर माझ्या जवळ आला व म्हणाला—
" आपल्याला कोठें जावयाचें आहे ? "

मी म्हणालों—“ नंबर जी. स्ट्रीट वाय्. एम्. सी. ए.”

“ ठीक आहे, एक मिनिट थांबा.”

या ऑफिसरच्या संकेतावरून एक गाडी माझ्या जवळ आली. या पोलिस ऑफिसरनें माझ्या हातांतील बॅग घेतली व मला मोटारींत बसण्यास सांगितलें. त्याचे आभार मानून मी मोटारीनें वाय्. एम्. सी. ए. ला आलों.

---

# प्रकरण २४ वें

एक अमेरिकन गृहस्थ हिंदुस्थानांत कांहीं दिवस राहून परत येथें नुकतेच आले होते. अकस्मात् त्यांची व माझी भेट झाली. बोलतां बोलतां सहज मी म्हणालों—“ आपल्याला मुंबई शहराबद्दल काय वाटतें ? ”

ते म्हणाले—“ धूळ व भिकारी सोडून दिल्यास मुंबई सुंदर शहर आहे.”

त्या गृहस्थाची ही टीका आपल्याकडील सर्वच शहरांना लागू पडेल. अमेरिकेंतील सरकार व समाज यांच्या सहकरितेनें धूळ व भिकारी यांचें उच्चाटन सर्वच शहरांतून झालें आहे. वॉशिंग्टन शहराची स्वच्छता नमुनेदार आहे. ठिकठिकाणीं फूटपाथवर ठेविलेल्या कचराकुंडीवर ‘ तुमची राजधानी स्वच्छ ठेवा ’ अथवा तुमची ‘ इस्टेट यांत टाका ’ असें ठळक अक्षरांत लिहिलेलें असतें.

न्यूयॉर्क सोडून वॉशिंग्टनला आल्यावर मला कितीतरी आनंद झाला. रस्त्यावर दोन्ही बाजूला उंच व दाट अशा वृक्षांच्या रांगा, जागोजागीं सुंदर अशा बागा, अशा बागेकडे दर्शनी भागाकडून असलेलीं अनेक दुकानें व घरें वगैरे पाहून मन अगदीं प्रसन्न होतें. न्यूयॉर्कच्या गगनचुंबी इमारतींमुळें तेथें आकाशाचें दर्शनसुद्धां दुर्लभ.

वॉशिंग्टनला आल्यावर अफाट अशा आकाशाचें दर्शन झालें. रात्रीच्या वेळेस विजेच्या झकझकीत प्रकाशानें न्यूयॉर्क शहरांत दिपलेल्या माझ्या नेत्रानें कितीतरी दिवसांनंतर आज आकाशांत तारे व चन्द्र असल्याचें पाहिलें.

वॉशिंग्टन शहराच्या इमारती सर्वसाधारण दोन पासून दहा मजल्या-पर्यंत उंच आहेत. बाजार सोडून इतर भागांतील घरांभोंवतीं लहान लहान गुच्छदार फुलांचे बगीचे व पुष्पयुक्त लतांनीं आच्छादिलेल्या भिंती असतात. आपल्या घराच्या बागेभोंवतीं कांटेरी कुंपण अथवा कंपाउंड बांधण्याची इकडे पद्धत नाहीं. फूटपाथला लागूनच बाग असते. भटकीं किंवा देवाला सोडलेलीं पोळ जनावरें इकडे नसल्यामुळें बागेचें आपो-आपच रक्षण होतें. शाळेचीं मुलें थट्टामस्करी करीत फुटपाथवरून जातात, पण हाताशेजारीं असलेल्या कोणत्याहि फुलझाडांना स्पर्श करीत नाहींत.

न्यूयॉर्कप्रमाणें वॉशिंग्टनला भूगर्भ रेल्वे नाहींत. ट्राम व बसेस् विपुल असल्यामुळें त्यांची इतकी गरजहि भासत नाहीं. ट्राम हा शब्द इकडे कोणालाहि कळत नाहीं. ट्रामला स्ट्रीटकार असें म्हणतात. मुंबईला विजेनें चालणाऱ्या ट्रामच्या तारा वर दिसतात पण वॉशिंग्टनला ट्रामच्या व विजेच्या तारांचा संयोग जमिनीखालीं असल्यामुळें तारांचें जाळें वर कोठेंच दिसत नाहीं. ड्रायव्हर हाच कंडक्टरचें काम करतो.

माझ्या प्रवासांत मी नेहमींच वाय्. एम्. सी. ए. मध्यें रहात असे. न्यूयॉर्क व वॉशिंग्टनमधील वाय्. एम्. सी. ए. त बराच फरक आहे. पहिल्याची वृत्ति तुटक व व्यापारी तर दुसऱ्याची अत्यंत सलोख्याची व घरोब्याची. आपण गेल्यावर पहिल्याचा व्यवस्थापक आपल्याळा म्हणेल—'जागा सर्व भरल्या आहेत. दुसरीकडे जा' अथवा जागा रिकामी असल्यास म्हणेल—'किती दिवस रहाणार तुम्ही! त्याचे पैसे अगोदर द्या व अमक्या नंबरच्या खोलीची किल्ली घ्या.' परंतु वॉशिंग्टनला वाय्. एम्. सी. ए. चा व्यवस्थापक असें कधींच म्हणणार नाहीं. तो आपल्याला पाहिल्याबरोबर

म्हणेल–"नमस्कार, आपलें स्वागत असो. मी कशा रितीनें आपल्याला मदत करूं?" न्यूयॉर्कमधील लोक शेजारी असले तरी आपणहून कधींच दुसऱ्यांशीं बोलणार नाहींत. पण वॉशिंग्टनमध्यें माझे नेहमीं बदलणारे शेजारी अगदीं नेहमींच बंधुत्वाच्या नात्यानें वागत. संध्याकाळच्या वेळेस त्यांच्याबरोबर खेळणें, पोहणें, जेवणें सर्वच गोष्टी मी करीत असें. इतकेंच नव्हे तर दोन चार दिवसांत परस्परांचीं नांवें घेऊन आम्ही एकमेकांना हांका मारूं लागलों. व्यवस्थापक म्हणतो–"मिस्टर रामचंद्रराव, हिंदुस्थानचें तुमच्या नांवावर पत्र आलें आहे." दुसरा म्हणतो—"मिस्टर राव, तुमच्या देशाबद्दल न्यूयॉर्क टाइम्स काय लिहितो, वाचलेंत का?" वगैरे वगैरे. एकंदरींत येथील वातावरण अगदीं खेळीमेळीचें आहे. एक हंगामी अमेरिकन मित्र डोक्यास फेटा गुंडाळून माझ्या खोलीवर आला व दरवाजाला टिक् टिक् करीत म्हणतो—"दरवाजा खोलो." मला वाटलें कोणी हिंदी मनुष्य आहे. पाहतों तों ही दुसरीच व्यक्ति निघाली. तो मला म्हणाला—"मला शीख होणें आवडतें. शिखाला दाढीमिशा असतात. परंतु मी शीख उणे दाढीमिशा आहे."

इतकें त्याचें बोलणें झाल्यावर आम्ही खालीं आलों व उपाहार करून सिनेमाला गेलों. रस्त्यावरील कितीतरी लोक माझ्या मित्राच्या फेट्याकडे पाहात व माझ्याकडे पाहात. कांहीं ठिकाणीं त्यांनीं अशी बतावणी केली कीं, मी हिंदुस्थानचा एक राजकुमार आहे व तो माझा सेक्रेटरी आहे. अर्थात् थट्टेशिवाय या गोष्टीला कांहींच किंमत नव्हती. शिवाय अमेरिकन लोकशाहीपुढें राजे व राजकुमारांना कोण किंमत देणार?

वॉशिंग्टनला विशेष प्रामुख्यानें दिसून येणारी गोष्ट म्हणजे गत-कालीन पुढाऱ्यांचीं व सैनिकांचीं स्मृतिचिन्हें. हीं चिन्हें ठिकठिकाणीं दिसून येतात. जागोजागीं असलेल्या बागेंत, हिरवळी मैदानावर, तलावाच्या मध्यभागीं, त्रिकोणी इमारतीच्या कोपऱ्यावर व जिथें जिथें विशेष रीतीनें नजरेंत भरेल अशा ठिकाणीं हीं स्मारकें असतात. कांहीं ठिकाणीं पुतळे, तर कांहीं ठिकाणीं उंच उंच स्तूप आहेत. जॉर्ज वॉशिंग्टनचें स्मारक

सर्वांत उठावदार आहे. पांचशें साठ फूट उंचीचा हा एक दगडी स्तूप आहे. याच्या खालचें क्षेत्रफळ साठ चौरस फूट आहे. शिखरावर चांदीसारखा चकाकणारा ॲल्युमिनियम धातूचा मनोरा आहे. या स्मारकाचा पाया छत्तीस फूट खोल असून खालचें क्षेत्रफळ १२५ चौरस फूट आहे. सन १८४८ मध्यें याची पायाभरणी होऊन सन १८८५ मध्यें हा स्तंभ पूर्ण बांधण्यांत आला. या स्मारकाच्या भोंवतीं दूरवर पसरलेली व व्यवस्थित कापून संरक्षित केलेली हिरवळ आहे. जगप्रसिद्ध इमारत कॅपिटॉल याच्या समोर हें स्मारक आहे. हें कॅपिटॉल व हा स्तूप यांच्या दरम्यान चौकटींत बसविल्याप्रमाणें हिरवळीचा गालिचा आहे व त्यांत एक एक फर्लांग लांबीचे व अरुंद असे अनेक हौद आहेत. या हौदांत हजारों कारंजीं उडत असतात. या स्मारकाच्या पायथ्याला सभोंवार कोच ठेवले आहेत. या स्तूपमधून शेवटच्या टोंकास जाण्याकरितां लिफ्ट आहे. एका वेळेस सुमारें पन्नास लोक या लिफ्टमधून वर जाऊं शकतात. आंतून वर जाण्यास जिना आहे. याच्या पायऱ्या ९०० आहेत. वरती जात असतांना व शिखराच्या खिडकींतून देखावे पाहात असतांना लाउड स्पीकर-वरून जॉर्ज वॉशिंग्टनचें संक्षिप्त चरित्र वर्णन केलें जातें. नंतर या स्मारकाचा इतिहास सांगतात. हा स्तूप संगमरवरी दगडाचा असून पायापासून शिखरापर्यंत त्याचें एकूण वजन १२१६३२ टन आहे. बांधणीचा एकंदर खर्च ११,८७,७१० डॉलर ३१ सेंट झाला. जॉर्ज वॉशिंग्टनचें चरित्र सांगतांना आपल्या मोडक्यातोडक्या सैन्याच्या मदतीनें ज्यांच्या साम्राज्यावर सूर्य मावळत नाहीं अशा इंग्रजांचा पराभव त्यानें कसा केला याचें रसभरीत व बहारीचें वर्णन केलें. तो शेवटीं जाहीर करतों —"जगांत स्वातंत्र्याच्या प्रसाराबरोबर जॉर्ज वॉशिंग्टनचें नांवहि प्रसार पावेल.—"

जॉर्ज वॉशिंग्टनचें खरें स्मारक माऊंट व्हर्नान येथील त्याची समाधी व रहातें घर आहे. येथें जाण्याकरितां आम्हीं खास ट्रिप काढली होती. स्टीमलॉंचमध्यें बसून विस्तीर्ण अशा पोटोमॅक नदीमधून सुमारें तीन मैल

आम्ही खालच्या बाजूला गेलों. किनाऱ्याला दोन्हीकडे दाट झाडी आहे. माऊंट व्हर्नान हा दाट व उंच वृक्षांचा एक निसर्गसुंदर डोंगर आहे. पाऊलवाटेनें वृक्षांच्या बुंध्यांतून वाट काढीत आम्ही वर चढलों. प्रथम वॉशिंग्टनच्या समाधीचें दर्शन घेतलें व तेथील रिवाजाप्रमाणें फुलांचा हार त्यावर ठेवला. येथें बरीच गर्दी होती. सर्व मंडळी अत्यन्त आदरानें व स्तब्धतेनें उभी राहिलेली व समाधीभोंवतीं हलक्या पावलांनीं फिरत असलेली पाहिली. कांहीं विचारपूस करावयाची असल्यास हळूच कानांत बोलावयाचें. अशा ठिकाणीं पूर्ण शांतता राखण्याची काळजी घेतली जाई. त्याच्या घोड्याची पागा पाहिली. या घोड्यावर बसून जॉर्ज रपेट करीत असे. घोडा काळाच्या उदरांत गडप झाला पण त्याचें साज-सामान जॉर्ज असतांना पागेंत जेथें ठेवीत असत तेथेंच ठेविलें आहे. त्यांचें घर अत्यन्त साधें असून सर्वच एक मजली आहे. परंतु निजण्या-करितां एक दोन खोल्या वरच्या मजल्यावर आहेत. त्याच्या वापरा-वयाच्या सर्व वस्तु जेथल्या तेथें जपून ठेवल्या आहेत. स्वयंपाकाच्या भांड्यापासून संसाराला लागत असलेल्या सर्व वस्तु तेथें दिसतात. मोठ्या अवजड अशा दोन पलंगावर जॉर्ज व त्याच्या पत्नीचें अंथरूण घालून ठेवलें आहे. आपल्या घराच्या बागेंत आपल्या उतारवयांत सुद्धां जॉर्ज वॉशिंग्टन साधारण माळ्याप्रमाणें काम करी. अशा ठिकाणीं कांहीं तास घालविल्यावर त्या महान् व्यक्तीचे गुण गात आम्ही परत फिरलों.

---

## प्रकरण २५ वें

व्हाईट हाऊस हें अमेरिकन अध्यक्षांचें निवासस्थान आहे. पहिला अध्यक्ष जॉर्ज वॉशिंग्टन ह्यानेंच ही जागा पसंत केली आहे. या इमारतीचा कोनशिला—समारंभ त्याच्या हस्तें १७९२ सालीं झाला. आपल्या पत्नीच्या संमतीनें त्यानें या इमारतीची आखणी केली. उभयतांच्या खास देखरेखीखालीं ही इमारत सन १७९९ सालीं बांधली.

ही दोन मजली इमारत अगदीं साधी आहे. याचा रंग चारी बाजूनें पांढरा असल्यामुळें याला व्हाईट हाऊस असें म्हणतात. या इमारतीच्या दर्शनी भागासमोर व्यवस्थित कापून ठेविलेलें हिरवळीं मैदान आहे. या मैदानाच्या मध्यभागीं एक वर्तुळाकार हौद आहे. या हौदाच्या मध्यभागीं सुमारें वीस फूट उंच उडत असलेलें पाण्याचें कारंजें आहे.

अमेरिकेसारख्या वैभवसंपन्न राष्ट्राच्या अध्यक्षाचें घर इतकें साधें असेल याची कल्पना मला नव्हती. आपल्या हैद्राबादेंतील राजा प्रतापगीरकोठी या व्हाइट हाऊसपुढें कितीतरी शानदार दिसते. या हाऊसच्या आसपास असलेल्या इमारती किती तरी भव्य, प्रचंड व सुंदर दिसतात. अमेरिकेच्या अध्यक्षांनीं नेहमीं साध्या घरांत रहावें असा जॉर्जचा हेतु असेल, तर दीडशें वर्षें हा हेतु अमेरिकन अध्यक्ष तडीस नेत आहेत. समाजाच्या अत्यंत खालच्या थरांतून येऊन आपल्या गुणानें अध्यक्षपदीं आरूढ झालेले हे थोर गृहस्थ साध्या घरांतच राहण्यांत अभिमान बाळगतात.

आपल्याकडील एखाद्या रेल्वे स्टेशनला ज्याप्रमाणें लोखंडी कंपाऊंड असतें, त्याप्रमाणें या इमारतीच्या भोंवतीं कंपाऊंड असल्यामुळें याच्या लगत असलेल्या फुटपाथवर उभें राहून कित्येक लोक अत्यंत आदरानें व कौतुकानें या इमारतीचें दर्शन घेतात व आपल्या कॅमेरानें फोटो काढतात. विशेष गोष्ट ही कीं, या अध्यक्षांच्या वाड्याच्या फाटकावर एकच पोलिस ऑफिसर पहारेकरी म्हणून असतो आणि तो सुद्धां तेथें असलेल्या एका लहानशा खोलींत फाटकाकडे तोंड करून खुर्चीवर बसलेला असतो. आपल्यासारख्या लोकांनीं त्याला कांहीं माहिती विचारली तर तो देण्यास नेहमीं तयार असतो. आपल्याकडे गव्हर्नरच्या बंगल्याकडे पाहण्याचें धैर्यच कोणाला होत नाहीं. लांब कशाला आपल्या हैद्राबादेंतच सरकारी वाड्यावरून जातांना–'अदबसे जाव, नीचे नजर रखो' या हुकुमाचा अनुभव पुष्कळांना येतो. आणखी एक गंमत येथें पाहण्यासारखी आहे. या वाड्याच्या हिरवळी मैदानावर व आसपास

असलेल्या झाडीवर पुष्कळ कबुतरें व खारी आहेत. हीं कबुतरें व या खारी फार माणसाळलेल्या आहेत. कबुतरें हळूच येऊन आपल्या खांद्या-वर बसतील आणि आपल्या हातांतील शेंगदाणे खातील तर खारी आपल्या केसाळ व पिंजारलेल्या लठ्ठ शेपट्या घेऊन आपल्या तळहातावर धरलेल्या खाद्यावर यथेच्छ ताव मारतील. स्वतंत्र रीतीनें बागडणारे हे न पाळलेले प्राणी या व्हाईट हाऊसकडे येणाऱ्या प्रत्येक माणसाचें लक्ष वेधून घेतात.

अमेरिकेच्या स्वातंत्र्य–युद्धांत सन १८१४ सालीं इंग्रजांनीं या वाड्या-वर हल्ला केला आणि आग लावून याची नासधूस केली. युद्धसमाप्ती-नंतर या वाड्याची डागडुजी झाली.

अध्यक्ष ट्रुमन सध्यां येथें रहात नाहींत. परंतु सर्व राजकीय खलबतें व्हाईट हाऊसमध्येंच होतात. व्हाईट हाऊसच्या समोरचा रस्ता ओलांडल्यावर थोडे बाजूला ब्लेअर हाऊस आहे. येथें ते सहकुटुंब राहतात. हा वाडा फुटपाथला लागूनच आहे. याच्या आजूबाजूला सर्वसाधारण लोकांचीं घरें व दुकानें आहेत. हा छोटासा तीन मजली वाडा हिंदुस्थानांतील एखाद्या मध्यमवर्गीय सुखवस्तु माणसाच्या घराप्रमाणेंच आहे. या वाड्यावर राष्ट्रध्वज फडकत असतो व दरवाजासमोर फुटपाथवर एक पोलिस शिपाई उभा असतो यावरून ओळखावयाचें कीं, येथें कोणी विशेष गृहस्थ राहतात. भारताचे प्रधानमंत्री पंडित नेहरू हे सुद्धां या ब्लेअर हाऊसमध्यें एका साध्या खोलींत अध्यक्ष ट्रुमनचे पाहुणे म्हणून राहिले होते. त्यावेळेस अमेरिकन राष्ट्रध्वजाबरोबर भारताचा तिरंगी झेंडा फडकत असतांना मीं पाहिला.

ज्या वेळेस पंडित नेहरू लंडनहून अमेरिकेला आले, त्यावेळेस माझा वॉशिंग्टनला मुक्काम होता. भारतीय वकिलातीच्या ऑफिसमधून व वर्तमानपत्रावरून त्यांची नक्की येण्याची तारीख मला कळली. अकस्मात् त्याच वेळेस आम्ही तिघेचौघे हिंदी विद्यार्थी एके ठिकाणीं राहात असूं; आम्हांला तो दिवस एका मोठ्या सणाप्रमाणें वाटला. वॉशिंग्टनच्या

विमानतळावर एक तास अगोदर जाऊन आम्ही बसलों. न्यूयॉर्कहूनहि कांहीं भारतीय आले होते. अमेरिकन नागरिक व ऑफिसर मोठ्या प्रमाणांत उपस्थित होते. भारतीयांना विमानतळाच्या अंतरभागापर्यंत जाण्याची सर्रास मोकळीक होती. परंतु फक्त निमंत्रित अमेरिकन स्त्री-पुरुषांनाच आंत सोडलें जाई. श्रीमती विजयालक्ष्मी पंडित आपल्या वकिलातीच्या कामगार मंडळींसह विमान उतरण्याच्या जागीं उभ्या होत्या. अध्यक्ष ट्रुमन आपल्या मंत्रिमंडळासह तेथें आले. लष्कराच्या नाविकदल, विमानदल, पायदल यांतील शिपाई व ऑफिसर्स आपापल्या



पंडित नेहरू वॉशिंग्टन विमानतळावर उतरले त्यावेळचा देखावा

युनिफार्ममध्यें निरनिराळ्या रांगेंत अत्यंत शिस्तीनें उभे होते. लंडनहून येणारें विमान पूर्व दिशेनें येणार म्हणून आम्ही त्या दिशेकडे टक लावून पाहात उभें होतों. दूर आकाशांत एक पक्षी उडत आहे असें तें विमान आम्हांला दिसलें. थोड्या अवकाशांतच अध्यक्ष ट्रुमन यांनीं पंडित नेहरूंना आणण्याकरितां पाठविलेलें 'इंडिपेंडन्स' नांवाचें खास विमान खालीं उतरलें. या विमानाचा पृष्ठभाग चमकणाऱ्या अॅल्युमिनियम पत्र्याचा होता. यावर दोन्ही बाजूला 'इंडिपेंडन्स' हें नांव मोठ्या अक्षरांत लिहिलें होतें. या

विमानाच्या पुढील भागावर तिरंगी झेंडा फडकत होता. विमानाचा दरवाजा उघडतां क्षणींच पंडित नेहरू दरवाजांत उभे असलेले दिसले. टाळयांच्या कडकडाटांत त्यांचें हार्दिक स्वागत करण्यांत आलें. नंतर तोफांची सलामी झाली आणि अमेरिकन लष्करी बँडनें भारतीय राष्ट्रगीत 'जनमनगण' वाजविण्यास सुरुवात केली. प्रथम ट्रुमनसाहेबांनीं हस्तांदोलन करून त्यांचें स्वागत केलें. यावेळेस उंच अशा व्यासपीठावर नेहरू व ट्रुमन उभे होते. ट्रुमन यांचें नंतर स्वागतपर भाषण झालें. ते म्हणाले—"भारतीय पंतप्रधान म्हणून नव्हे तर उच्च चारित्र्यसंपन्न गृहस्थ म्हणून मी आपलें स्वागत करतों." पंडित नेहरू थोडक्यांत आभार मानून म्हणाले—"अमेरिकन स्वातंत्र्यशाहीचे सिद्धान्त भारताला नेहमींच मार्गदर्शक आहेत." नंतर पं. नेहरूंनीं निरनिराळया लष्करी दलांची पाहणी केली. यावेळेस ट्रुमन व नेहरू हे जोडीनें चालत होते. नंतर सन्माननीय पाहुण्यांच्या ओळखी करून देण्यांत आल्या. आमच्याकडे पंडितजी आले. आम्ही सर्वांनीं टाळया वाजवून त्यांचें स्वागत केलें व प्रत्येकाजवळून ते जात असतांना आम्ही भारतीय पद्धतीप्रमाणें हात जोडून नमस्ते म्हटलें. नेहमींप्रमाणें डोक्यावर शुभ्र खादी टोपी व शेरवानी घातलेल्या पंडितजींनीं आम्हां भारतीयांकडे पाहून आपलेपणाचा भाव चेहऱ्यावर दर्शवीत आमच्या नमस्तेचा हंसतमुखानें स्वीकार केला.

दुसऱ्या दिवशीं श्रीमती विजयालक्ष्मी पंडित यांनीं वॉशिंग्टन येथें राहणाऱ्या भारतीयांना खास निमंत्रण देऊन पंतप्रधानांच्या सन्मानार्थ एक समारंभ घडवून आणला. एक तास अगोदरच मी भारतीय वकिलातीच्या कचेरीसमोर उभा होतों. हेतु हा कीं पंडितजी आल्याबरोबर त्यांचा एखादा फोटो घ्यावयाचा. पंडितजींची मोटार येण्याच्या अगोदर अमेरिकन सरकारनें त्यांच्या शरीररक्षणार्थ दिलेले पांच पोलिस ऑफिसर्स आपापल्या मोटारसायकलवर बसून हजर झाले. पाठीमागून पंडितजींची गाडी आली. चौघेजण गाडींतून उतरले. यावेळेस

पंडितजींनीं अप्टुडेट् सूट घातल्यामुळें आम्ही फसलों. अजून त्यांची मोटार कशी आली नाहीं याची उत्कटतेनें आम्ही वाट पहात उभे राहिलों. नंतर कळलें कीं, पंडितजी आंतमध्यें गेले सुद्धां. आमचा कॅमेरा बंद करून आम्हींहि आंत पळालों.

हा समारंभ केवळ भारतीयांकरितां असल्यामुळें परदेशी गृहस्थ कोणीहि येथें नव्हता. या समारंभाचे दोन भाग होते. एका दिवाण-खान्यांत व्यक्तिशः भेट व दुसऱ्यांत खाद्यपेयांची सोय. प्रत्येकानें आपली आपण ओळख करून द्यावयाची व हात जोडून नमस्कार केल्यावर हस्तांदोलन करावयाचें. जेव्हां माझी पाळी आली तेव्हां मी त्यांना माझी थोडक्यांत हिंदीमध्यें ओळख करून दिली व अमेरिकेंत येण्याचा माझा उद्देश त्यांना सांगितला. पंडितजी मला म्हणाले—" तुमचा शैक्षणिक निरीक्षणाचा अमेरिकेंतील प्रवास भारताला लाभदायक होवो."

हा गोड कार्यक्रम संपल्यावर खाद्यपेयाच्या दिवाणखान्यांत गेलों. येथेंहि पंडितजी आले. गर्दीच्या मानानें खाण्याचे पदार्थ कमी व त्यांत आमच्या अधाशीपणाची गैरशिस्त तेथेंहि दिसून आली. आपल्या एकाच तोंडीं चार चार तोंडांत मावेल इतके मोठे घास कोंबण्याची घाई कित्येकांनीं केली. वाढण्यास आणणाऱ्या माणसांच्या ताटांतूनच जिन्नस ओढून घेण्यांत येत. या वेळेस पंडितजींना सुद्धां त्यांच्याकडे न पाहतां ढकलून बाजूला सारण्यांत येई. नंतर पंडितजी बराच वेळ निरनिराळ्या भारतीयांबरोबर बोलत असलेले दिसले. खाणें संपल्यावर गर्दी पांगली व आम्ही पाहुण्यांचा निरोप घेऊन तेथून निघालों.

---

# प्रकरण २६ वें

वॉशिंग्टनला केंद्रीय सरकारच्या शिक्षण व पुनर्व्यवसायखात्याच्या कचेऱ्यांना फेडरल ऑफिसेस् म्हणतात. येथील अधिकाऱ्यांच्या मार्गदर्शना प्रमाणें मी निरीक्षणाचा प्रवास करीत असे. हा प्रवास कधीं दोन आठवड्यांचा असे तर कधीं तीन आठवड्यांचा असे. प्रवासाहून आल्यावर मी माझा अहवाल प्रत्येक वेळेस या फेडरल ऑफिसला सादर करीत असे. आंतरराष्ट्रीय शिक्षण खात्याचे प्रमुख अधिकारी थॉमस् कॉटनेर हे माझ्या प्रवासाची व्यवस्था करीत. शिक्षणखात्याच्या प्रमुख अधिकारी रोमेन मॅकी या वयोवृद्ध विदुषी एम्. ए., एल्एल्. डी. आहेत. या बाईच्या देखरेखे-खालीं माझा अभ्यास अत्यंत यशस्वी रीतीनें पार पडला. केव्हांही जा, त्या हंसतमुखानें माझें स्वागत करीत आणि माझ्या अभ्यासाबद्दल चौकशी करीत. कांहीं वेळेला माझ्या घरची खुशालीहि त्या विचारीत असत. एकदां तर त्यांनीं मला घरीं जेवावयास बोलाविलें. त्यांच्या घरीं त्यांची वृद्ध मातोश्री होती. तिचें वय नव्वद वर्षांचें होतें. घरांत स्वयं-पाकाला व घरकामाला एक निग्रो बाई आहे. आपल्या वृद्ध मातेची सेवा करण्यांत त्या आपल्याला धन्य समजतात. जेवतांना मीं जरा दबकतच त्यांना प्रश्न विचारला " आपल्या घरीं मुलें कोणी दिसत नाहींत ? "

त्या म्हणाल्या—"माझ्या आईकडे कोण पाहील?" अशा आदर्श व एकाकी जीवन व्यतीत करणाऱ्या डॉ. रोमन मॅकीनें आपल्या ऑफिसरचा अधिकार मला कधींच जाणवूं दिला नाहीं.

केंद्रीय शिक्षणखात्याच्या अनेक शाखा एकाच इमारतींत आहेत. ही पांच मजली इमारत अत्यंत भव्य व प्रचंड आहे. कोणत्याही मजल्यावर जाण्यास फिरते जिने आहेत. सोन्याचा मुलामा दिलेले पितळेचे रुंद जिने विजेच्या प्रकाशांत चमचम करीत फिरत असतात. एका पायरीवर आपण उभे राहिलों म्हणजे ही पायरी आपोआप वरती जाते. येथें शेंकडों खोल्या आहेत. प्रत्येक खोलींत एखादी कचेरी आहेच. सर्व

खोल्यांचे दरवाजे नेहमींच बंद ठेवण्याची पद्धत आहे. खोलींत काम करीत असलेल्या मुख्य अधिकाऱ्याचें नांव दरवाजावर लिहिलेलें असतें. पूर्वी सांगितल्याप्रमाणें येथें चपराशी नसतो. चपराशाचें काम स्वतः अधिकारी किंवा त्याचा सेक्रेटरी अथवा टेलिफोनच्या मदतीनें केलें जातें.

शैक्षणिक व औद्योगिक परिषदेकरितां येथें मोठमोठे दिवाणखाने आहेत. प्राथमिक शिक्षणाच्या तज्ज्ञांची परिषद येथें झाली, त्यावेळेस मी हजर होतों. सुमारें शंभर एक मंडळी वर्तुलाकार मांडलेल्या खुर्च्यांवर बसली होती. परिषदेला माझी ओळख करून देणारी डॉ. रोमेन मॅकीहि तेथें होतीच. माझी ओळख करून देत असतांना मी उभा होतों व सर्व स्त्री–पुरुषांचे डोळे मजकडे लागले होते. माझी ओळख करून दिल्यावर सर्वांनीं टाळ्या वाजवून माझें स्वागत केलें. माझ्याप्रमाणेंच दोघे जर्मन प्रोफेसर्स परिषदेला उपस्थित होते. पूर्वीच्या जर्मन राजघराण्यांतील बाई कौंटेस सिल्विया [illegible] ही म्युनिच युनिव्हर्सिटीमध्यें प्राध्यापिका आहे. ही शाळेंत शिकत असतांना यांच्या गांवीं कविश्रेष्ठ रवीन्द्रनाथ टागोर आले होते. भारतीय पद्धतीनें फुलांचा हार करून त्यांच्या गळ्यांत घालण्याचा मान हिला मिळाला होता. अत्यंत अभिमानानें तिनें ही हकीगत मला सांगितली. दुसरे जर्मन गृहस्थ प्रोफेसर पॉल विलपर्ट हे बव्हेरियांत प्राध्यापक आहेत. आपल्या घरीं कांहीं दिवस मीं रहावें अशी त्यांनीं इच्छा प्रदर्शित करून माझा पत्ता उतरून घेतला. एकदां हे दोघे जर्मन प्रोफेसर्स व मी एका खोलींत बसलों असतां मी त्यांना विचारलें–"आपण येथें कशाला आलांत?"

प्रो. पॉल विलपर्ट—जर्मनींतील अमेरिकन सरकारनें आम्हांला इकडे पाठविलें आहे म्हणून आम्ही आलों.

मी— आपला उद्देश काय आहे?

प्रो. पॉल विलपर्ट—अमेरिकन लोकशाहीचीं तत्त्वें आम्ही येथें शिकून जर्मनींत गेल्यावर याचा विद्यार्थीवर्गांत प्रसार करावा असा सरकारचा उद्देश आहे.

मी—भारतीय जनतेला जर्मनीबद्दल अनेक कारणानें आदर व अभिमान वाटतो व युद्धानंतर त्यांच्यावर आलेल्या आपत्तींबद्दल पुष्कळांना सहानुभूति वाटतें.

दोघां प्रोफेसरांचे डोळे पाणावले व भरलेल्या हृदयानें आम्हीं परस्परांना आलिंगन दिल्यावर ही मुलाखत समाप्त झाली.

---

# प्रकरण २७ वें

याच फेडरल ऑफिसमध्यें अंध व मूक यांच्या शिक्षण व व्यवसाय शाखा आहेत. या दोन्ही शाखांचे अधिकारी अनुक्रमें अंध व मूक आहेत.



उजवीकडून :— जोसेफ क्लुंक ( अंध ), मिसेस रोमेन मॅकी, फेडरल सरकारचे मुख्य शिक्षणाधिकारी, वॉशिंग्टन.

अंध शाखेचे प्रमुख मिस्टर जोसेफ क्लंक यांचें चरित्र धाडसी कृतींनें भरलेलें आहे. हायस्कूलचें शिक्षण संपल्यावर यांनीं कित्येक वर्षे फेरी-वाल्याचा धंदा केला. या अंध फेरीवाल्यानें स्वतःच्या बुद्धीनें व मेहनतीनें उपजीविका करून समाजाला दाखवून दिलें कीं, अंध परोपजीवी नाहींत. नंतर ओहिओ स्टेट सरकारनें यांची अंध–शिक्षण व व्यवसाय सल्लागार म्हणून नेमणूक केली. या काळांत रात्रीचे विद्यार्थी म्हणून त्यांनीं आपलें नांव कॉलेजांत दाखल केलें. उच्च शिक्षण संपून हे कायद्याचे पदवीधर झाले. त्यांनीं नंतर वकिलीचा धंदा सुरू केला. त्यांचें व्यक्तित्व पाहून कॅनडा सरकारनें त्यांची अंधव्यवसाय केंद्राचें तपासणी करणारे एक बडे अधिकारी म्हणून नेमणूक केली. आठ वर्षांच्या कालांत दरवर्षीं चाळीस हजार मैलांचा प्रवास करून त्यांनीं ठिकठिकाणीं अंध समाजाची संघटना केली. थोडक्याच काळांत त्यांच्या कर्तृत्वानें कॅनडांतील अंधांनीं निरनिराळे धंदे करून दहा लक्ष डॉलर मिळकत मिळविली. यानंतर अमेरिकन सरकारनें त्यांची धंदेशिक्षणाचे मुख्य अधिकारी म्हणून नेमणूक केली. अमेरिकन जनतेनें त्यांना एक मानपत्र व सुवर्ण पदक अर्पण करून त्यांचा गौरव केला. मलाहि या प्रसंगीं निमंत्रण होतें. भारतीय अंधांनीं स्वाभिमानी जीवन कसें व्यतीत करावें याबद्दलच्या बहुमोल सूचना त्यांनीं मला दिल्या. माझ्या अमेरिकेंतील निरीक्षणाच्या कामाबद्दल प्रशंसापत्र भारतीय सरकारला व युनायटेड नेशनला त्यांनीं पाठविलें.

वॉशिंग्टनपासून तीस मैल दूर असलेल्या एका खेडेगांवांत मि. क्लंक यांचें स्वतःचें घर आहे. एकदां त्यांनीं मला घरीं जेवावयास बोलाविलें होतें. घर शोधून काढण्याचा ठीक पत्ता या अंध विद्वानानें टेलिफोन-वरूनच मला सांगितला. त्यांच्या घरीं गेल्यावर त्यांनीं माझें स्वागत केलें. त्यांनीं आपलें टुमदार घर मला दाखविलें. आपली बायको, आई व मुलामुलींची माझ्याशीं त्यांनीं ओळख करून दिली. जोसेफ हे शरीरानें पहिलवान आहेत. त्यांना सुतारकामाचा छंद आहे. त्यांनीं सुमारें वीस हजार रुपयांचीं यंत्रें व अवजारें आपल्या तळघराच्या खोलींत

लावून ठेविलीं आहेत. ते लाकडी कलाकुसरीचीं कामें अत्यंत सुबक रीतीनें करून बाजारांत विकण्यास पाठवितात. ते एकदां मला म्हणाले— "सरकारी किंवा खाजगी कठीण प्रश्नांचें ज्या वेळेस मला उत्तर सांपडत नाहीं, त्या वेळेस मी माझ्या आवडत्या सुतारकामास सुरवात करतों. नंतर उत्तर आपोआपच सांपडतें मला. छंद हा माझ्या जीवनांतील आत्मा आहे." ते खूप विनोदी असल्यामुळें माझा वेळ अगदीं मजेंत गेला.

फेडरल कचेरीच्या शिक्षणशाखेंत एक मोठें ग्रंथालय आहे. या ग्रंथालयाच्या शाखा व उपशाखा अनेक आहेत. या शाखा व उपशाखा निरनिराळ्या हॉलमध्यें असल्यामुळें अभ्यासकांची चांगली सोय झाली आहे. अंध, मूक, शारीरिक व मानसिक व्यंगें असलेल्या लोकांच्या शिक्षणपद्धतीवर, त्यांच्या मानसशास्त्रावर, त्यांच्या सामाजिक व राजकीय जीवनावर प्रकाश पाडणारे हजारों ग्रंथ एकएका शाखेंत आहेत. या विशेष शास्त्राला वाहून घेतलेलीं शेंकडों मासिकपत्रें व त्यांचे नवे जुने अंक व्यवस्थित ठेवलेले आहेत. या ग्रंथालयाचा मींहि थोडाफार फायदा घेतला. माझ्या अभ्यासाच्या टेबलावर टाईपरायटर, लेखनसाहित्य वगैरे आवश्यक वस्तु ठेवलेल्या होत्या. वाचन करून मी टिपणें करीत असे व कांहीं शंका आल्यास माझ्या टेबलावर असलेल्या टेलिफोननें फेडरल कचेरींत काम करीत असलेल्या विद्वानाबरोबर त्या शंकेचें निरसनहि करून घेत असे.

या ग्रंथशाखेची लायब्रेरियन एक तरुण स्त्री होती. ही मोकळ्या मनाची असल्यामुळें भारतीय व अमेरिकन समाजपरिस्थितीबद्दल विशेषतः स्त्रीसमाजाबद्दल आम्ही नेहमीं बोलत असूं. हिंदी समाजांत मुलींचे पालक तिच्या भावी पतीचें संशोधन करितात हें ऐकून तिला फारच आश्चर्य वाटलें. ती म्हणाली — "हा जुलूम आम्ही अमेरिकन मुली कधींच सहन करणार नाहीं. माझेंच पाहा ना ! मी एका तरुणाला माझा भावी पति म्हणून पसंत केलें. माझी आई या लग्नाच्या विरुद्ध होती. मी सरळ तिला म्हणालें—'तुला कांहीं त्या तरुणाबरोबर दिवस काढावयाचे नाहींत.

मला तो पटला आहे ! मी लग्न करणार." माझें लग्न होऊन आज पांच वर्षें झालीं तरीहि माझें पतीवरचें प्रेम अजून कायम आहे."

एकदां तिनें मला प्रश्न विचारला—" रात्रीचें जेवण झाल्यावर तुम्ही नवराबायको काय करतां ?" मी म्हणालों—" मी बाहेरच्या हॉलमध्यें येऊन रेडिओ ऐकतों किंवा वर्तमानपत्र वाचतों व माझी बायको घरांतील उष्टीं-खरकटीं काढण्याचें आणि भांडीं घासण्याचें काम करते."

ती ताबडतोब म्हणाली—" माझा नवरा जर असा वागूं लागला तर त्याचें टाळकें फोडून टाकीन मीं." असें म्हणून तिनें जवळ असलेला रूळ घेऊन जोरानें टेबलावर आपटला व पुढें ती म्हणाली—" गरीब बिचारीनें घराच्या कोपऱ्यांत एकटीनें काम करावें आणि तुम्ही मात्र आराम करावा, हा कोठला न्याय !"

याला उत्तर मीं दिलें—" तुझ्या नवऱ्यासारखा मला जांवई पाहिजे, परंतु मी तसा पति होऊं इच्छित नाहीं." ती हंसत म्हणाली—" तुम्हीं भारतीय पुरुष फारच स्वार्थी आहांत."

---

# प्रकरण २८ वें

वॉशिंग्टनला आल्यापासून भारतीयांच्या भेटी नेहमींच होत असत. यांत विद्यार्थिवर्गाचा भरणा जास्त असे. आपल्या खर्चानें येथें आलेलीं श्रीमंत घराण्यांतील मुलें अमेरिकन चैनी आयुष्याला बळी पडलेलीं मला दिसलीं. अमेरिकन संस्कृतींत लहानपणापासून वाढलेल्या एका चौदा वर्षाच्या हिंदी मुलाशीं माझी ओळख झाली. तो हायस्कूलमध्यें शिकत होता. त्याच्याकडे नेहमीं भारतांतून चिवडा व पेढ्यांचें पार्सल येत असे. त्याचें भारताबद्दलचें अज्ञान व अमेरिकन स्त्रियांविषयीं वक्रज्ञान पाहून मला जरा आश्चर्यच वाटलें.

सरकारी स्कॉलरशिप् घेऊन शिक्षण घेणारे भारतीय विद्यार्थी

वॉशिंग्टनला एकदां तरी येतातच. अत्यंत हुशार म्हणूनच त्यांची निवड झालेली असते. यांतहि वशिलेबाजीमुळें साधारण बुद्धीचा व कमी अकलेचा मालहि दृष्टीस पडतो. अमेरिकन विद्यापीठांत आपल्या उद्योगानें व बुद्धीच्या प्रभावानें चमकत असलेले अनेक हिंदी विद्यार्थी आहेत. परंतु त्याबरोबर अमेरिकन वैभवाला दिपून जाऊन भारतीय संस्कृति ही रानटी आहे असें म्हणणारेहि कांहीं विद्यार्थी मीं पाहिले. हिंदुस्थानांत शुद्ध शाकाहारी म्हणून टेंभा मिरविणाऱ्या जातीचे सुपुत्र व सुकन्या अमेरिकेंत आल्यावर गोमांस व डुकराचें मांस मिटक्या मारीत खातांना दिसतात. शाकाहारी विद्यार्थ्यांची नवोदित मांसाहारी टिंगल करण्यास कमी करीत नाहींत. शिवाय अमेरिकन विद्यार्थिनींशीं मैत्री करणें हें जरी शिष्टसांप्रदायास अनुसरून असलें तरी हिंदुस्थानांतील बंदिस्त वातावरणांत वाढलेले हे विद्यार्थी येथें बंधनापलीकडे जातात. अमेरिकन तरुण व तरुणींच्या चुंबनाला हस्तांदोलनापेक्षां जास्त महत्त्व नाहीं. पण भारतीय तरुण व अमेरिकन तरुणीच्या चुंबनाचें परिणाम भारतीयांच्या शारीरिक व मानसिक खळबळीनें प्रगट होतात. अशा सहवासाचे दूरगामी परिणाम झालेलीं उदाहरणें आहेत.

एके दिवशीं एक भारतीय विद्यार्थी एका अमेरिकन तरुणीबरोबर फिरावयास गेला. रात्रीं ११ च्या सुमारास तो आपल्या खोलींत परत आला, तेव्हां तो आम्हांला निराळ्याच स्वरूपांत दिसला. त्याच्या ओठा-वर व गालावर लिप्स्टिकच्या रंगाचे छाप पडलेले होते. चेहरा फुगलेला व डोळे लाल झालेले पाहून माझ्या एका हिंदी मित्रानें त्याची विचारपूस केली. चुंबनाच्या पलीकडे जाण्याची इच्छा नसलेल्या त्या तरुणीनें या तरुणाच्या विद्याभ्यासांत कांहीं दिवस व्यत्यय आणला. दुसरा एक विद्यार्थी सोडचिठ्ठी घेतलेल्या एका युरोपियन तरुणीबरोबर निर्वेधपणें हंगामी पतिपत्नीचें नातें जोडून वागत असे. ब्रह्मचर्य झूट व आत्म-संयमन हें थोतांड आहे असें सांगणारा एक हिंदी विद्यार्थी मला आव्हान करून म्हणाला—" भुकेची तृप्ति भोजनानें आणि लैंगिक वासनेची

हांक सहवासानें तृप्त होते." आपल्या सहचारिणीची तसबीर त्यानें आपल्या टेबलावर ठेविली होती. ती मला दाखवून तो म्हणाला—"सहवासोत्तर होत असलेल्या समाधानानें माझा अभ्यास चांगला होतो."

आम्ही एकदां दोघेतिघे हिंदी मित्र मिळून उपाहारगृहांत गेलों. आमच्या एका मित्राची अमेरिकन मैत्रिणही बरोबर होती. गप्पा मारीत आईस्क्रीम खात असतांना त्याच्या मैत्रिणीनें आपल्या उष्ट्या चमच्यांत आईस्क्रीम घेऊन त्या हिंदी मित्राच्या तोंडांत घातलें. दुसऱ्या दिवशीं या मित्राची व माझी गांठ पडली. त्यावेळेस मी त्याला म्हणालों —"थोरामोठ्यांचा मुलगा तूं आणि खुशाल त्या बाईचे उष्टें खातोस. लाज तर नाहींच, परंतु आरोग्याच्या दृष्टीनें तरी तूं कांहीं विचार कर."

तो म्हणाला—"तिची निराशा जर मीं केली तर तिच्या आनंदी सहवासाला मुकावें लागेल मला. तिच्या हंसऱ्या चेहऱ्यांत आकर्षक जादू आहे."

एका हिंदी विद्यार्थ्यानें तर याहून वरताण केली आहे. अकस्मात् या विद्यार्थ्याची व माझी भेट बसकरितां वाट पाहात असतांना झाली. हिंदी चेहरा पाहून मीं त्याला विचारलें—'आपण कोणत्या राष्ट्राचे व आपलें नांव काय ?" सुदैवानें ते महाराष्ट्रीयच निघाले आणि पुढें आम्हीं मराठींतच बोलावयास सुरुवात केली. ते म्हणाले —"मुंबईचा मॅट्रिक झाल्यावर वडिलांच्या पैशावर मी इकडे आलों. इकडे येऊन मला तीन वर्षें झालीं व अजूनहि तीन वर्षें मी येथें राहणार आहे. मी येथें अमेरिकन मुलीशीं लग्नहि केलें आहे." मी त्याचें अभिनंदन करून गोऱ्या वहिनीच्या भेटीची इच्छा दर्शविली. त्या दोघांनीं जवळच्या खेड्यांत बिऱ्हाड थाटलें होतें. एका रविवारीं त्यांच्या घरीं मला जेवावयासहि बोलावण्यांत आलें. ठरल्यावेळीं मी गेलों. त्या वेळीं एक अमेरिकन जोडपेंहि निमंत्रित होतें. आमच्या वहिनी उभ्या राहून स्वयंपाक करीत होत्या. तिच्याशीं मी हस्तांदोलन करून हिंदी पति निवडला म्हणून तिचें अभिनंदन केलें.

मी मांसाहार घेत नाहीं हें ऐकल्यावर त्या उभयतांनीं खेद व्यक्त केला. आनंदाच्या वातावरणांत भोजन संपल्यावर आम्ही चांदण्या रात्रीं बाहेर फिरावयास गेलों. अशाच गप्पा मारीत असतांना ती म्हणाली —— "मला हिंदुस्थान फार आवडतो. मला माझ्या सासऱ्यानें बनारसी पाठविली आहे. माझ्या पतीला मीं पुष्कळ वेळां सांगितलें मला नेसवा म्हणून, परंतु ते मला येत नाहीं म्हणून नकार देतात. तुम्ही तरी एकदा प्रयत्न करून मला उपकृत करा. मीं मनानें हिंदी आहें व पोषाखानेंहि आतां हिंदी होऊं इच्छिते."

मी म्हणालों—"माझी बायको वा माझी मुलगी माझ्याबरोबर असती तर तिनें योग्य रीतीनें तुला शिकविलें असतें. मला वाईट वाटतें कीं, मी सुद्धां तुमची निराशा करतों."

लग्न झाल्यापासून हें नूतन जोडपें आर्थिक अडचणींत सांपडल्यामुळें या मुलीनें एका उपाहारगृहांत आठ तासांची वाढण्याची नोकरी पतकरली होती व अशा रीतीनें ती आपल्या पतीला पैशाची मदत करीत असे. हा उच्च कुळांतील महाराष्ट्रीय विद्यार्थी हिंदुस्थानांत आल्यावर ही गोरी तरुणी एकत्र कुटुंबांतील मुलाबाळांच्या रामरगाड्यांत किती दिवस टिकेल याची शंकाच वाटते!

मुलींच्या भानगडींत न पडणारे कैक भारतीय विद्यार्थी आहेत. कांहीं हुशार विद्यार्थी रात्रंदिवस स्वैर संचार करूनहि परीक्षेंत पहिला नंबर पटकाविणारे आहेत. दोघे किंवा तिघे विद्यार्थी एक खोली घेऊन स्वहस्तें स्वयंपाक करणारेहि मीं पाहिले. स्नानसंध्या करणाऱ्या एका कट्टर कर्मिष्ठ दाक्षिणी ब्राह्मण विद्यार्थ्याचा जोडीदार पाकिस्तानांतील एक कट्टर मुसलमान विद्यार्थी होता हेंहि माझ्या दृष्टीस पडलें. या खोलींत असलेल्या या दोघां विद्यार्थ्यांचा सलोखा पाहून मी म्हणालों— "काय हो, तुम्ही हिंदुमुसलमान एकमेकांच्या उरावर बसत नाहीं का ?"

ते दोघेहि हंसून म्हणाले—"आम्ही वादविवाद करतों. गुद्दागुद्दी करून निराळे राहिल्यास इतकी स्वस्त खोली मिळणार नाहीं आम्हांला. आमचा अभ्यासाचा विषय एकच असल्यामुळें आमचीं राजकीय व धार्मिक मतें बाजूला ठेवून आम्ही एकत्र राहतों."

---

# प्रकरण २९ वें

राजकारणावर किंवा राष्ट्राराष्ट्रांत तेढ उत्पन्न होईल अशा विषयावर मी कधींच बोलत नसे. हा नियम मीं अत्यंत काळजीपूर्वक पाळावा अशी लेखी सूचना संयुक्त राष्ट्रानें मला दिली होती. परंतु राजकारण, धर्मकारण व समाजकारण यांची एकमेकांची मर्यादा कोठें संपते याचें निश्चित आकलन मला होत नसल्यामुळें मी नकळत राजकारणाच्या भोंवऱ्यांत सांपडत असें.

हैदराबाद संस्थानांतून मी येथें आल्यामुळें त्यासंबंधीं अनेक प्रश्न मला विचारले जात. हैदराबादेंतील एक गृहस्थ पाकिस्तानमध्यें मोठ्या कामगिरीवर आहेत. त्यांची भेट न्यूयॉर्क व वॉशिंग्टनला झाली. आम्ही दोघे हैदराबादी म्हणून आणि दोघांच्या ओळखीचे अनेक लोक तेथें आहेत म्हणून आमची मैत्री झाली. त्यांच्या आग्रहामुळें मी एक दिवस त्यांच्या घरीं जेवण्यास गेलों होतों. हे गृहस्थ अलीकडे पाकिस्तानी झाल्यामुळें त्यांच्या बोलण्यांत तुमचा देश व आमचा देश हे शब्द फार येत असत. ते एकदां मला म्हणाले—"तुमच्या देशांत अन्न-टंचाई आहे. आमच्या देशांत आम्ही खाऊन उरलेलें धान्य परदेशांत पाठवितों. म्हणून तुमची स्वतंत्रता फार दिवस टिकणार नाहीं." धर्मसाहिष्णुतेबद्दल बोलतांना ते म्हणाले—"आमच्या जमातीपासून दुसऱ्या जमातीला कधींच धोका नसतो. पाहा, माझ्या बंगल्याचें नांव जें होतें तेंच मीं अजूनहि कायम ठेविलें आहे."

एका गांवीं मला हॉटेलमध्यें रहाण्यास जागा पाहिजे होती. मी हॉटेलमध्यें जागा आहे का तें विचारीत असतां, त्या अमेरिकन गृहस्थानें मी हिंदु आहे का मुसलमान आहे याची चौकशी केली. रझाकार पुढाऱ्याला कायद्यानें संरक्षण देणारा वकील हिंदुस्थानांत मिळत नाहीं

अशी बातमी रझाकार पुढाऱ्याच्या पत्नीनें पाकिस्तानांत राहून साऱ्या दुनियेंत जाहीर केली. मी हैद्राबादचा म्हणून मला अनेक प्रश्न विचारून भंडावून सोडीत. सर्व जगांत श्रीमंत असे हैद्राबादचे निजाम हिंदुस्थानचे निर्वासित म्हणून अमेरिकेला येणार आहेत, अशी खबर वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली. इतकेंच नव्हे तर न्यूयॉर्क शहराबाहेर लॉंग आयलंड येथें एक किल्ला त्यांनीं विकत घेतला आहे व या किल्ल्यांतील दिवाण-खाने योग्य अशा फर्निचरनें सध्यां सजविले जात आहेत, अशा तऱ्हेची बातमी एका अमेरिकन कॉलेजच्या डीननें मला दिली. एका वर्तमानपत्राचे प्रतिनिधी माझ्या शैक्षणिक कामगिरीबद्दल मुलाखत घेण्यास आले असतां त्यांनीं कांहीं राजकीय प्रश्नहि मला विचारले. दुसऱ्या दिवशींच्या वर्तमानपत्रांत माझा उल्लेख करून भाषणबंदीचे भडक मथळे छापले. एका वर्तमानपत्राच्या धूर्त प्रतिनिधीनें मला विचारलें– "हैद्राबाद पोलिस ॲक्शनच्या वेळेस आपण कोठें होता ?"

मी म्हणालों–"मी हैद्राबादलाच होतों. परंतु माझीं बायकामुलें मीं हैद्राबाद संस्थानच्या बाहेर पाठविलीं होती."

दुसऱ्या दिवशींच्या वर्तमानपत्रांत ही बातमी फारच विकृत स्वरूपांत प्रसिद्ध झाली.—"स्वतंत्र हैद्राबादेवर हिंदुस्थान सरकारनें विमानांतून बॉंबहल्ला केला, त्यावेळेस सुरक्षिततेसाठीं मिस्टर रावनें आपलें कुटुंब मुंबईला रवाना केलें होतें." या बातमीची दुरुस्ती ताबडतोब मीं पाठविली, पण ती कोणीच प्रसिद्ध केली नाहीं.

---

# प्रकरण ३० वें

" मी कांहीं हिंदुस्थानच्या मदतीची अपेक्षा करीत नाहीं. "

" तर मग आपला योगक्षेम येथें कसा चालतो? आपण हिंदु संन्यासी व आपल्याभोंवतीं आधिभौतिक सुखांत चैनीची पराकाष्ठा मानणाऱ्या स्त्रीपुरुषांची गर्दी. ज्यापासून डॉलरची उत्पत्ति होत नाहीं अशा तुमच्या अध्यात्मशास्त्रास येथें कोठून वाव असणार ? "

बॉस्टन शहरांतून वहात असलेल्या चार्लस् नदीच्या कांठावर श्रीरामकृष्ण मंदिर आहे. ही नदी पाहिल्यावर कलकत्त्याला दक्षिणेश्वर व बेलुरमठाच्या मध्यभागीं वहात असलेल्या भागीरथीची आठवण होते. चार्लस् नदीच्या किनाऱ्यावर गर्द झाडी व व्यवस्थितींत राखलेली मखमली हिरवळ आहे. अशा निसर्गरम्य जागेंत असलेल्या श्रीरामकृष्ण मंदिराचे चालक श्रीस्वामी अखिलानंद आज २५ वर्षें अव्याहत काम करीत आहेत.

स्वामीजी म्हणाले—" मनाला शांति देणाऱ्या उपनिषदांच्या ग्रंथांचा प्रसार येथें जास्त आहे. स्वामी विवेकानंदांनीं लावलेल्या अध्यात्मिक वृक्षाच्या शीतल छायेंत अमेरिकन स्त्रीपुरुष जमतात व माझा योगक्षेम चालवितात."

रविवारचा दिवस तो. आज सकाळीं दहा वाजतां श्रीरामकृष्ण मंदिरांत स्वामी अखिलानंद उपासना चालविणार म्हणून मी अर्धातास अगोदरच तेथें गेलों. स्वामीजींच्या अमेरिकन वृद्ध शिष्या स्वागतासाठीं मंदिराच्या दारांत उभ्या होत्या. आपल्या गुरुजींच्या देशांतून आलेल्या मला पाहून त्यांनीं माझें प्रेमानें स्वागत केलें. त्या मला म्हणाल्या—" स्वामी विवेकानंदांना व स्वामी ब्रह्मानंदांना आपण पाहिलेंच असेल. श्रीरामकृष्ण परमहंसांचें साधनामंदिर दक्षिणेश्वरला आपण पाहिलेंच असेल. "

त्यांना उत्तर देऊन मी आंत गेलों. एका दिवाणखान्यांत १००–१५० अमेरिकन स्त्रीपुरुष जमले होते. समोरच्या वेदीवर श्रीरामकृष्ण परमहंसांची

तसबीर व उजव्या आणि डाव्या बाजूच्या भिंतीवर स्वामी विवेकानंद व स्वामी ब्रह्मानंद यांच्या तसबिरी होत्या. त्यांच्यापुढें मेणबत्त्या जळत होत्या. अशा गंभीर व शांत वातावरणांत वेदीच्या पाठीमागील दरवाजां-तून स्वामी अखिलानंद यांनीं प्रवेश केला. पायापर्यंत भगवा झगा, कमरेला भगवा पट्टा व पायांत भगव्या रंगाचे बूट अशा पोषाखांत



स्वामी अखिलानंद व लेखक; पाठीमागें श्रीरामकृष्ण मंदिर, बॉस्टन.

असलेल्या स्वामीजींनीं हंसतमुखानें उभे राहिलेल्या स्त्रीपुरुषांचें स्वागत केलें. प्रथम स्वामीजींनीं संस्कृतमध्यें वैदिक प्रार्थना म्हटली व शेवटीं 'ओम् शान्तिः शान्तिः शान्तिः' म्हणून आपली प्रार्थना संपविली. या वैदिक प्रार्थनेच्या इंग्रजी रूपांतरित मुद्रित पत्रिका अगोदरच मंडळीमध्यें वांटल्या गेल्या होत्या. स्वामीजींच्या पाठोपाठ इंग्रजी-मध्यें आम्हींहि प्रार्थना म्हटली. यानंतर स्वामीजींनीं 'ईश्वर प्रेमस्वरूप आहे' या विषयावर उपनिषद् व बायबलचे उतारे देऊन आपल्या प्रभावी वाणीनें जमलेल्या मंडळींना मंत्रमुग्ध केलें. कार्यक्रम संपल्यावर स्वामीजींचा आशीर्वाद घेऊन जात असतांना आपापल्या ऐपतीप्रमाणें लोकांनीं त्यांना दक्षिणा दिली.

शेवटीं मी एकटा राहिलों. मला बसण्यास सांगून स्वामीजी आंत गेले. नंतर पंधरा मिनिटांनीं जेव्हां ते बाहेर आले तेव्हां अपटुडेट पोषाखांत मीं त्यांना पाहिलें. आम्ही दोघे एक तास बोलत बसलों. भारताची राजकीय व सामाजिक सुधारणा कशी होईल व लोकांचें दारिद्र्य कसें दूर होईल, वगैरे विषयांवर आमचीं बोलणीं झालीं. स्वामीजींनीं मला भोजनाचा आग्रह केला. त्यांच्या अमेरिकन शिष्येनें भात, आमटी, भाजी, चक्का दही वगैरे तयार करून आम्हाला वाढलें. अमेरिकेंत काम करीत असलेल्या श्रीरामकृष्ण मिशनची माहिती त्यांनीं मला सांगितली. विद्वान् व त्यागी हिंदु संन्याशाला अमेरिकेंत सन्मानानें राहतां येतें हें स्वामी अखिलानंदांनीं सिद्ध केलें आहे. शेवटीं आठवण म्हणून 'Hindu Psychology' नांवाचा आपला ग्रंथ भेट म्हणून त्यांनीं मला दिला व मींहि त्यांच्या शेजारीं उभा राहून फोटो काढून घेतला. त्यांचा निरोप व आशीर्वाद घेऊन मी तेथून निघालों.

---

# प्रकरण ३१ वें

बॉस्टन शहरांत मी पंधरा दिवस होतों. तेथें अखिल अमेरिकन अंधांची परिषद् झाली. इकडील परिषदेची व्यवस्था फार सोयीस्कर व सुटसुटीत असते. या परिषदा मोठमोठ्या हॉटेलसमध्यें भरतात. खोलीचें भाडें व जेवणाचा खर्च प्रत्येक प्रतिनिधीनें करावयाचा असतो. ज्या दिवशीं परिषदेला सुरुवात व्हावयाची त्या दिवशीं ठरलेल्या वेळेपूर्वी दोन तास आधीं सर्व प्रतिनिधी उपस्थित असतात. नंतर प्रतिनिधींची सूचि तयार होते व बिल्ले दिले जातात.

या परिषदेला सुमारें एक हजार अंध व त्यांच्या हितार्थ झटणारे तितकेच डोळस प्रतिनिधी एकाच हॉटेलमध्यें उतरले होते. उद्घाटन समारंभ मॅसाचुसेटस् राज्याच्या राज्यपालाच्या हस्तें झाला. प्रथम ईश-

स्तवन एका अंध बाईनें ऑर्गनवर म्हटल्यावर राष्ट्रगीत झालें. सर्वांनीं उभे राहून एका सुरांत राष्ट्रगीत म्हणण्याची इकडे पद्धत आहे. नंतर राज्यपालाचें स्वागतपर भाषण झालें व आपल्या राज्यांत शंभर वर्षांच्या कालांत अंधकल्याणाकरितां काय काय करतां आलें याचा इतिहास सारांशरूपांत त्यांनीं सांगितला.

मुख्य परिषदेची चार शाखेंत विभागणी केली गेली व त्या त्या विषयानुसार चार मोठ्या दिवाणखान्यांत सभा चालू झाल्या. ज्याला ज्या विषयाची आवड असे तिकडे तो प्रतिनिधी जाई. हिंदुस्थानचा प्रतिनिधी म्हणून मला दहा मिनिटें खुल्या अधिवेशनांत भाषण करण्याची संधि दिली. या भाषणांत भारतीय अंधांचें सामाजिक जीवन कसें असतें हें मीं सांगितलें. करमणुकीचे कार्यक्रम व सहली असल्याविना परिषद् पूर्ण होत नाहीं. अंध व डोळस स्त्रीपुरुषांचे गायन-वादनाचे जलसे झाले. सहलींचे मात्र तीन प्रकार होते--शैक्षणिक, ऐतिहासिक व मनोरंजनपर. शैक्षणिक सहलींत जगप्रसिद्ध Massachusetts Institute of Technology ( M. I. T. ) बॉस्टन व हार्वर्ड विद्यापीठ ग्रंथालय, अंधांच्या शाळा वगैरे संस्था आम्हीं पाहिल्या. तान्हेल्या मुलांच्या एका अंध शाळेंत दोन दिवसांच्या मुलापासून तीन वर्षांपर्यंतचीं अंध मुलें होतीं. प्रत्येक मुलाला एक दाई ठेविली होती. मुलांच्या वाढत्या गरजेप्रमाणें त्यांना खेळणीं दिलीं जात. त्याचप्रमाणें त्यांना गाणींहि ऐकविलीं जातात. चिक्कण माती व बारीक वाळूमध्यें अथवा पाण्याच्या उथळ हौदांत एकदोन वर्षांचीं अंध मुलें इतस्ततः बागडत असतांना मीं पाहिलीं. मुलांचे स्वच्छ कपडे, अंथरूणपांघरूण, गुटगुटीत निर्मळ मुलें, अशा संस्थेंत काम करणाऱ्या शुभ्र पोषाखधारी दाया पाहून वाटतें कीं, गरीब हिंदुस्थानला अशी संस्था परवडणें शक्य नाहीं. या सहलींत कवि लॉंगफेलो व तत्त्वज्ञ श्रेष्ठ इमर्सन् राहत असलेलीं घरें आम्हीं पाहिलीं.

अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धांत बॉस्टन शहरवासीयांनीं इंग्रजांविरुद्ध

पहिली गोळी झाडली. इंग्लंडहून चहा घेऊन आलेल्या जहाजावर जाऊन याच लोकांनीं तीनशें बेचाळीस पेट्या बंदराच्या समुद्रांत फेकून दिल्या. ' The Boston Tea Party ' म्हणून प्रसिद्ध असलेली ही जागा आम्हीं पाहिली. स्वातंत्र्यासाठीं ठिकठिकाणीं सांडलेल्या अमेरिकन रक्तावर हुतात्म्यांचीं स्मारकें बॉस्टन शहराच्या आसमंतांत आहेत. हीं स्मारकें दाखवीत असतां आमच्या अमेरिकन वाटाड्यानें इंग्रज कोठें लपून बसले होते व कोठें कोठें ते मारले गेले याचें रसभरीत वर्णन मोठ्या त्वेषानें केलें. अमेरिकन कप्तान पार्कर ज्या प्रचंड शिळेजवळ मारला गेला त्या शिळेवर त्याचें अमर वाक्य कोरलें आहे:—

" Stand your ground,
Don't fire unless fired upon
If they mean to have war,
Let it begin here.

—*Captain Parker*

अशा ऐतिहासिक सहलीनंतर आम्ही एका ' स्टीमलॉंच ' मध्यें बसून सुमारें १५० २०० मैल ॲटलांटिक महासागरांत समुद्रपर्यटन करून आलों. या सहलींत तीनशें स्त्री-पुरुष होते. लहान लहान कॅन्व्हसच्या खुर्च्या घेऊन आम्ही कोठेंहि डेकवर समुद्राकडे तोंड फिरवून बसत असूं. रेडिओच्या लाउडस्पीकरवर संगीत चालू असे. क्वचित् पावसाचे तुषार व समुद्राच्या प्रचंड लाटांपासून आमच्या अंगावर फेकले जाणारे जलबिंदु आम्हांला हर्षभरीत करीत. अशा आनंदी वातावरणांत डेकवर स्त्री-पुरुष तालांत नाचत असत. सहचर अथवा सहचारिणी न मिळाल्यास येथील स्त्री-पुरुष एकएकटे नाचण्यास कमी करीत नसत.

या सहलींत मीं अनेकांशीं मैत्री जोडली. इसाबेला नांवाच्या एका अंध पदवीधर तरुणीनें हिंदुस्थानविषयीं अनेक प्रश्न विचारले मला. पहिलाच प्रश्न तिनें मला विचारला ' What is the theory of Karm ? ' मी चकित झालों. या मुलीला गीतेंतील कर्मसिद्धांत कसा माहीत

झाला याचा मी विचार करूं लागलों. ती मला पुढें म्हणाली—" मी जरी आंधळी आहें तरी मिस्टर नेवर ( नेहरू ) यांचा 'Discovery of India' हा ग्रंथ पूर्णपणें मीं वाचून घेतला आहे. त्यांत कर्मयोगाची महती वर्णन केली आहे." मीं तिला गीताग्रंथाची पार्श्वभूमि स्पष्ट करून सांगितली. कर्मयोगाचा अभ्यास करण्याकरितां हिंदुस्थानांत येण्याची इच्छा तिनें दर्शविली. कॅनडाहून आलेल्या प्रतिनिधींनेंही

डावीकडून पहिली मिस् इसाबेला. गीतेंतील कर्मसिद्धांताचा अभ्यास करणारी आंधळी

मला अगदीं आपलेपणानें वागविलें. ' आपण एकाच राष्ट्रकुटुंबांतील माणसें आहोंत, आपलें नातें बंधुत्वाचें आहे ' असें म्हणून माझ्या खांद्यावर हात ठेवून ते चालत असत. भोजनास एकाच टेबलावर आम्हीं बसावें असा त्यांचा आग्रह असे. कॅनडाला येण्याबद्दल अनेकांनीं मला निमंत्रणाहि दिलें.

# प्रकरण ३२ वें

आब्राहम लिंकन हा अमेरिकेचा सोळावा अध्यक्ष. निग्रोंना गुलामगिरींतून मुक्त करण्याकरितां त्याला आपल्याच लोकांविरुद्ध झगडावें लागलें. शेवटीं कायद्यानें अमेरिकेंतील गुलामगिरी नष्ट होऊन लिंकनचा जय झाला. सर्व मानव-समाज समान आहे, काळा-गोरा भेद मानणें मानवतेला लांच्छनास्पद आहे, या उच्च तत्त्वानुसार वागणाऱ्या लिंकनचा खून त्याच्याच जातभाईनें केला.

आब्राहम लिंकनच्या थडग्याला भेट देणें हें माझें पवित्र कर्तव्य होतें. इंग्रजी शाळेंत असतांना लहानपणीं "O Captain, My Captain" ही कविता माझी पाठ झाली होती. कवीनें आब्राहम लिंकनच्या रक्ताळलेल्या प्रेताचें केलेल्या वर्णनाचा ठसा जणूं काय ती घटना समोर घडत आहे असा त्या कवितेंत उमटला होता. अभिनयश्रेष्ठ हरीन्द्रनाथ चट्टोपाध्यायनें ही कविता रेडिओवर म्हटलेंलीहि मीं ऐकली असल्यामुळें त्याचें थडगें पाहण्यास मी फारच उत्सुक झालों होतों.

इलिनॉय राज्यांतील स्प्रिंगफिल्ड गांवीं आब्राहम लिंकनचें थडगें आहे. एका अष्टकोनी खोलीच्या मध्यभागीं ही कबर आहे. या कबरीभोंवतीं संयुक्त राष्ट्रांतील राज्यांचीं निरनिराळीं निशाणें आहेत. या खोलीचे दगडहि सर्व राज्यांतून आणविले आहेत. तेथें एक स्मारकस्तंभ आहे. लिंकनचें ब्रीदवाक्य—'All men are created equal—' हें समोरच कोरलेलें दिसतें. लिंकनच्या आयुष्यांतील ठळक ठळक गोष्टी सांगणारा येथें एक गृहस्थ भेटला. मी फार दूर देशांतून आलों आहें असें त्याला समजल्यावर तितक्या गर्दीतून तो वाट काढीत माझ्याकडे आला. त्यानें लिंकनच्या चरित्राचें एक सचित्र पुस्तकहि मला फुकट दिलें. लिंकननें जगांतील वर्णभेद व वंशभेद नष्ट केला आहे, मानवप्राणी ईश्वराचीं लेंकरें आहेत असें तो सांगूं लागला. परंतु मला मात्र निराळाच अनुभव आला. मी त्याला म्हणालों—"माफ करा,

आपण जीं उच्च तत्त्वें सांगतां तीं तत्त्वें आपण व्यवहारांत आणीत नाहीं असा माझा अनुभव आहे. अमेरिकेंत दक्षिणेंतील राज्यांत प्रवास करीत असतांना पुष्कळ वेळां माझी मानहानि झाली आहे. माझा वर्ण काळासावळा असल्यामुळें बसमध्यें प्रवास करीत असतांना मला पाठीमागच्या सीटवर बसावें लागे. आगगाडींत प्रवास करीत असतांना काळया माणसांच्या डब्यांत बसणें मला भाग पडे. स्टेशनवर वेटिंगरूम किंवा बाथरूम सुद्धां काळया गोऱ्यांकरितां निराळया आहेत. स्टेशनवर तिकिटें विकत घ्यावयाचीं म्हणजे काळया माणसाकरितां खिडकी निराळी



आब्राहम लिंकनचें कबरस्थान, स्प्रिंगफील्ड.

व गोऱ्या माणसाकरितां निराळी. एका गांवांत माझ्या गोऱ्या मित्राबरोबर रिस्टॉरंटमध्यें जेवण्यास गेलों होतों. टेबलावर आम्ही जाऊन बसलों, इतक्यांत व्यवस्थापिका बाई आल्या व मला म्हणाल्या—Your place is not here.‘तुम्ही येथें येऊं शकत नाहीं, बाहेर चालते व्हा.’ माझ्या मित्रानें माझी बाजू घेतली. पण ती ऐकेना; म्हणून आम्हां दोघांनाहि बाहेर जावें लागलें. एका गांवांत गोऱ्यांकरितां राखून ठेवलेल्या सिनेमाला जाऊं शकलों नाहीं म्हणून काळया लोकांच्या सिनेमाला

जाऊन बसलों. प्रत्येक ठिकाणीं 'मी हिंदुस्थानचा रहिवाशी आहे' असें सांगून माझा पासपोर्टहि दाखवीत असे; पण माझ्या वर्णामुळें मी खालच्या दर्जाचा समजला जाई. लिंकनच्या उदात्त तत्त्वाचें वर्णन आपण करितां हें ऐकून मला जितका आनंद होतो, तितकेंच माझा प्रत्यक्ष अनुभव सांगतांना वाईट वाटतें."

ते गृहस्थ म्हणाले–"वर्णभेदामुळें आमच्या देशांत ज्या लोकांनीं आपली मानहानि केली ते अज्ञानी व मूर्ख आहेत. आपल्याला त्रास झाल्याबद्दल मी आमच्या देशातर्फे आपली क्षमा मागतों."

येथील व्यवस्थापकांचे आभार मानून मीं रजा घेतली. लिंकनचें— "All men are created equal" या ब्रीदवाक्याचें मला आतां महत्त्व पटूं लागलें. एकदां दक्षिण भागाच्या एका राजधानींत रात्रीं दहा वाजतां मी उतरलों. झिमझिम पाऊस पडत होता. माझ्या नेहमींच्या रीतीप्रमाणें मी वाय. एम्. सी. ए. त उतरण्यास गेलों. मला पाहिल्याबरोबर व्यवस्थापकानें दरवाजा लावून घेतला व म्हणाला—"आमच्याकडे उतरण्यास जागा नाहीं. दुसरीकडे जा." दोन रस्ते ओलांडून मी एका मोठ्या हॉटेलपाशीं आलों. माझ्या चेहऱ्याकडे पाहात मॅनेजर म्हणाले— "हें हॉटेल तुमच्याकरितां नाहीं." मीं माझें Identification Card त्याला दाखविलें. तें पाहून तो म्हणाला—"स्टेशनच्या आसपास एक डॉलरी स्वस्त हॉटेल्स आहेत तिकडे जा." रात्रीचे १२ वाजले होते. अंधारी पावसाळी रात्र. हातांत बॅग घेऊन आश्रयार्थ मी भटकत भटकत त्या हॉटेलपाशीं आलों. या मॅनेजरनें माझें स्वागत केलें. मला हायसें झालें. येथील खोली म्हणजे ढेकणांचें माहेरघर. पायखाने व बाथरूम हिंदुस्थानच्या वेटिंगरूमची आठवण करून देणारे. तेथें राहणारे लोक कसे असतील याचें वर्णन न केलेलें बरें.

---

# प्रकरण ३३ वें

होल्डन नांवाचें खेडेगांव मिसुरी राज्यांत आहे. येथें मध्यमवर्गीय एक सुखी कुटुंब राहात होतें. या कुटुंबांत मी आठ दिवस राहिलों. हे गृहस्थ शेतकी पदवीधर व त्यांची पत्नी सामान्य पदवीधर होती. त्यांना शेती व तदनुषांगिक धंदे करण्याची फार हौस व आपल्या पतीला मदत



मिसेस प्रूसच्या कुटुंबांत लेखक

करण्याची त्यांच्या बायकोंची नेहमीं तयारी. त्यांना दोन वर्षांचा एक मुलगा व आठ आणि दहा वर्षांच्या दोन मुली होत्या. हीं मुलें मला uncle ( काका ) म्हणत.

मिस्टर प्रूस हे शिक्षित अंध शेतकऱ्यांचे मार्गदर्शक म्हणून सरकारी कामगार आहेत. मिसेस प्रूस पहाटे उठून आम्हां दोघांचे फराळाचे तयार करी. मिस्टर प्रूस पहाटे चार वाजतां उठून आपल्या गोठ्यांत असलेल्या दहा पंधरा गाईंचें स्वतःच्या हातानें दूध काढीत. ह्यांच्याकडे डुकरें व कोंबड्यांचीहि पैदास मोठ्या प्रमाणांत होत असे. याशिवाय त्यांच्या घराभोंवतीं कित्येक मैल पसरलेल्या मक्याच्या

शेताची व्यवस्था ते स्वतः पाहात. फक्त एकच नोकर त्यांनीं ठेवला होता. याला तीन वेळां जेवण देऊन रोज तीन डॉलर मजुरी म्हणजे सुमारें पंधरा रुपये मिस्टर प्रूस देत असत. दुपारीं व रात्रीच्या जेवणास हा नोकर मि. प्रूस व मिसेस् प्रूसच्या मध्यें बसून बरोबरीच्या नात्यानें गप्पा मारीत जेवीत असे. हा नोकर सकाळीं आठ वाजतां आपल्या मोटारींतून येई व रात्रीं आठ वाजतां सर्व काम आटोपून तो आपल्या घरीं जाई.

मिस्टर प्रूसच्या घरीं दोन मोटारी होत्या. एक त्यांना स्वतःला व दुसरी पत्नीला. घरांत टेलिफोनहि होता. पलंग, खुर्च्या, टेबल वगैरे फर्निचर मला दिसलें. अशा कुटुंबाला हिंदुस्थानांत खूप श्रीमंत समजतात; परंतु मिसेस् प्रूस मला नेहमीं म्हणत असत—“ आमचें मध्यमवर्गीय कुटुंब आहे. मोटार व फोन या आमच्या गरजेच्या वस्तु आहेत. ” मिस्टर व मिसेस् प्रूस आपल्या गरिबीमुळें जगप्रसिद्ध न्यूयॉर्क शहरहि पाहूं शकले नाहींत.

एके दिवशीं मिसेस् प्रूसनें खेडेगांवच्या बायकांची सभा आपल्या घरीं

होल्डन खेडेगांवांतील स्त्रियांनीं बोलाविलेली सभा

भरविली. मुख्य वक्ता मीच होतों. ‘ हिंदुस्थानांतील स्त्रियांचा सामाजिक

दर्जा '—यावर माझें भाषण होतें. भाषण संपल्यावर माझ्यावर प्रश्नांचा भडिमार झाला. या सभेंत वृद्ध स्त्रियाहि होत्या. हिंदी स्त्रियांना स्वातंत्र्य नाहीं, त्यांना गुलामाप्रमाणें वागविलें जातें, बालविवाहाची रूढी आणि विधवाविवाहाला व सोडचिठ्ठीला बंदी वगैरे प्रकार या मागासलेल्या देशांत आहेत, असा त्यांच्या प्रश्नांचा रोख होता. माझी बाजू सांभाळण्याकरितां मीं भारतीय स्त्री-रत्नांचीं उदाहरणें थोडक्यांत त्यांना सांगितलीं. सीता-सावित्रीपासून अर्वाचीन सरोजिनी नायडू व विजयालक्ष्मी पंडित पर्यंतचीं उदाहरणें मीं दिलीं. माता स्वर्गापेक्षां श्रेष्ठ आहे, माता देवीसमान आहे, असें भारतीय मानतात असेंहि मीं सांगितलें. मुलींचें लग्न त्यांचे आई-बाप जुळवून आणतात असें जेव्हां मी म्हणालों, तेव्हां त्या सर्व बाया खद-खदां हसूं लागल्या. " ही फार विचित्र चाल आहे " असें त्या म्हणाल्या. एक स्त्री मध्येंच उठून म्हणाली—" तुम्ही आपल्या बायकोला बरोबर न घेतां प्रवास करितां, यावरूनच आपण स्त्रियांना समान हक्क देत नाहीं हें सिद्ध होतें. "

चहापाणी व फोटो झाल्यावर ही चर्चा संपली.

मिस्टर प्रूसनें आंधळे शेतकरी कसें काम करतात हें पाहाण्याची संधि मला दिली. यांच्या मोटारींतून मीं सुमारें एक हजार मैल शेतांतून प्रवास केला. कॉन्सस शहरापासून १५० मैल दूर असलेल्या एका शेतांत एक अंध जोडपें रहात होतें. त्यांच्या घरीं एक दिवस व एक रात्र मीं काढली. नवरा व बायको दोघेहि आंधळीं होतीं. त्यांना मदत करण्यासाठीं कोणीच डोळस माणूस नव्हता. या शेतकऱ्याजवळ दोन घोडीं व कांहीं गाई आणि कोंबडीं होतीं. त्यांचें एक मक्याचें शेत असून त्यांत एक पिठाची गिरणीहि ते चालवीत असत. त्यांची मिळकत आपली गरज भागेल इतपत पैसे मिळविण्याची होती. आंधळ्या बाईनें माझ्यासाठीं शाकाहारी जेवण तयार केलें होतें. आम्ही सर्व मिळून संध्याकाळीं जेवावयास बसलों. मीं त्यांना हिंदुस्थानच्या शेतकऱ्या-विषयीं बरीच माहिती सांगितली. अंधार पडत चालला व माझे खाण्याचे

जिन्नस मला दिसेनात. तें अंध जोडपें मात्र आपल्या जेवणांत निमग्न



आंधळ्या शेतकऱ्याचा गुराखी–लेखक.

होतें. मी त्यांना म्हणालों—"अंधार पडला आहे, मला ताटांतील कोणताच पदार्थ दिसत नाहीं. मी डोळस असल्यामुळें मला दिवा



अंधपतिपत्नी शेतकरी.

लागतो." डोळसांना दिवा लागतो हें ते विसरले होते. जेवतांना ती

आंधळी बाई मला आग्रहानें वाढी. ती मला म्हणाली—" तुम्ही डोळस माणसें अंधारांत काम करूं शकत नाहीं. माझा आंधळा नवरा किती छान आहे पाहा. त्याला उजेडाची गरज नसल्यामुळें तो रात्रींसुद्धां शेतांत मेहनत करून आमच्या उत्पन्नांत भर टाकतो." जेवण झाल्यावर त्या आंधळया शेतकऱ्यानें शेजारीं जाऊन मी हिंदुस्थानचा एक मोठा पाहुणा त्यांच्याकडे आलों आहे असें सांगून त्यांचा कंदील आणला.

असेच आम्ही गप्पा मारीत बसलों असतां मीं तिला विचारलें— " तुम्ही दोघेहि पूर्ण आंधळे आहांत, तुमच्या लग्नाचें जुळलें कसें ? "

ती म्हणाली —" आम्ही दोघे एका अंध शाळेंत शिकत होतों. आमची दोघांची मैत्री झाली. आम्हां दोघांनाही शेती करण्याची आवड फार म्हणून आम्हीं शिक्षणानंतर विवाहबद्ध होण्याचें ठरविलें. आज लग्न होऊन आम्हांला पांच वर्षें झालीं आहेत. या झोपडींत आम्ही आज सुखानें रहात आहों. माझ्या नवऱ्यासारखा हुशार जगांत कोणी नसेल. शेतांत परका माणूस आला किंवा एखादें जनावर पिकांत शिरलें तर तो झोंपडींत विश्रांति घेत असला तरी त्याला आवाज ऐकूं येतो. हातांत काठी घेऊन त्या जनावराचा पाठलाग करून त्याला तो हाकलून देतो. आमचीं घोडीं इतस्ततः शेतांत चरतात पण माझ्या नवऱ्याला घोड्यांचा वास येतो. वास येतां क्षणींच चटकन् उठून तो त्यांना पकडून बांधून ठेवतो. माझ्या नवऱ्याचें घ्राणेंद्रिय व कर्णेंद्रिय इतकीं तीक्ष्ण आहेत, कीं तुमच्या फसव्या डोळ्यांची आम्हांला काय गरज ? "

अशा रीतीनें शेतांत काम करणारे अंध शेतकरी मला अमेरिकेच्या ओहिओ व मिसुरी राज्याच्या भागांत दिसून आले.

---

# प्रकरण ३४ वें

नॅशव्हिल शहर ही टेनिसी राज्याची राजधानी आहे. अफाट अशा कंबरलंड् नदीच्या दोन्ही कांठावर हें शहर वसलें आहे. या नदीवर प्रचंड असे आठ पूल बांधले आहेत. जगप्रसिद्ध टेनिसी व्हॅली बंधाऱ्यामुळें इकडील हजारों एकर जमीन समृद्ध झाली आहे.

नॅशव्हिल शहराला दक्षिणेंतील अथेन्स असें म्हणतात. येथील सरकारी व सार्वजनिक इमारतींच्या आकृती ग्रीक पद्धतीच्या आहेत. अथेन्समधील पार्थिनॉन इमारतीची हुबेहूब नक्कल सेंटिनीयल पार्कमध्यें आहे. वीस कोटी रुपये खर्च करून युद्धस्मारकाची बांधलेली ही इमारत उंच उंच व मोठाल्या शेंकडों अशा खांबांची आहे. टेनिसी राज्यांतून युद्धांत मृत पावलेल्या सर्व वीरांचीं नांवें येथील भिंतीवर कोरून ठेवलीं आहेत. या शहराच्या मध्यभागीं असलेल्या उंच डोंगरावर प्राचीन रोम शहरांतील ज्युपिटरच्या मंदिराप्रमाणें एक भव्य इमारत आहे. येथें येथील राज्याच्या मंत्रिमंडळाची सभा भरते. या इमारतीभोंवतीं असलेल्या डोंगराच्या उतारावर वृक्षराजी, लताकुंज व कित्येत कारंजीं आहेत. २०–२५ फूट उडणाऱ्या या कारंज्यावर रात्रीच्या वेळेस विजेच्या दिव्यांच्या साहाय्यानें रंगीबेरंगी किरणें फेंकण्याची व्यवस्था केली आहे. माझ्या राहत्या घरापासून ही कॅपिटल इमारत जवळच असल्यामुळें मी फावल्या वेळेस तेथें जात असे. आंत जाण्यास कोणासहि मज्जाव नाहीं. या इमारतीवरील शिखराच्या एका खिडकींतून मी कित्येक वेळपर्यंत निसर्गरमणीय देखावा पाहात असे.

येथील बऱ्याच शिक्षणसंस्था मीं पाहिल्या. माझ्या अमेरिकन स्नेह्याच्या आग्रहास्तव मी एका हॉस्पिटलला भेट दिली. येथील रोग्यांची शुश्रूषा करण्याकरितां शुभ्रवस्त्रधारी शेंकडों दाया आपापल्या कामांत मग्न असलेल्या मीं पाहिल्या. लहान लहान पाळण्यांत व पलंगावर शुभ्र मऊ अशा कापसावर पहुडलेल्या रोग्यांना पाहून मी आश्चर्यचकित

झालों. त्यांच्या कण्हण्याचे आवाजहि विचित्रच होते. हें माणसांचे इस्पितळ नसून ( Hospital for Cats ) मांजरांचें हॉस्पिटल होतें. रोग मांजरांच्या उपचारासाठींच हें रुग्णालय चालविण्यांत येत आहे.

येथील सरकारी अंध विद्यालयाच्या दोन शाखा मीं पाहिल्या एक गोऱ्या वर्णाकरितां व एक काळ्याकरितां. दक्षिणेंतील स राज्यांत ही पद्धत सर्रास दिसून येते. या दोन्ही शाखांचे मुख्य अध्यापक डॉ. कॅरोल थोड्याच दिवसांत माझे पक्के स्नेही बनले त्यांचें वय सत्तर वर्षांचें असून त्यांची शरीरयष्टि व उत्साह तरुणाप्रमाणे आहे. ते पूर्ण शाकाहारी असून त्यांनीं आपल्या आयुष्यांत कधींच मद्य प्राशन अथवा धूम्रपान केलें नाहीं. या त्यांच्या विशिष्ट गुणामुळेंच आम्ही जवळ जवळ येऊं शकलों. डॉ. कॅरोलनें उपनिषदांचा अभ्यासहि केल आहे. परंतु सर्व भाषांतरित ग्रंथांचाच. त्यांनीं कित्येकदां मला संस्कृत मध्यें सूत्रें म्हणावयास सांगितलीं; विशेषतः तीं आत्म्याच्या अमरत्वासंबंधं असलेलीं त्यांना फार आवडत. मी गीतेंतील दुसऱ्या अध्यायांतील कांही श्लोक म्हणून दाखविले व त्याचें भाषांतर करून सांगितलें. ते मला म्हणाले- " आपण हिंदुस्थानांत गेल्यावर मला या विषयावरील ग्रंथ पाठवून द्या."

त्यांचा निरोप घेऊन मी वॉशिंग्टनला परतलों तेव्हां डॉ. कॅरोलं स्नेहप्रेमानें भरलेलें एक लांबलचक पत्र मला पाठविलें. त्यांत ते लिहितातः-

We were very happy indeed to have you ...... India ha become a neighbour to us as a result of your visit. It i useless for me to tell you how much we enjoyed you as man. We think you are very sincere, honest and uprigh in your thinking with a zeal to help all underprivilege You will be a very welcome guest with us and we bi you Godspeed in your work. We shall be thinking of yo as the days and years go by and would be very happ indeed to hear from you at any time or from any of you students who would like to contact our student body Personally I look upon your visit as a great treat and m staff joins me in saying the same thing."

---

# प्रकरण ३५ वें

जगांत सृष्टिसौंदर्याकरितां अत्यंत श्रेष्ठ गणल्या जाणाऱ्या फ्लॉरिडा राज्यांत मीं प्रवेश केला. फ्लॉरिडा हा फळाफुलांचा देश. जगांतील नाना देशांतील लोक येथें विश्रांतीसाठीं येतात. 'Florida the Beautiful' हें नांव ह्याला यथार्थच आहे. कवि म्हणतो—

'Fair land of blossoms and waving palm of winds;
Soft laden with sweet rose — balm;
Fair land whose orange groves invite
The golden sun's resplendent light;
Whose countless birds their pæans sing
Till earth and sky — yea everything
Must ring : " O Florida ".

Glad land where joyous beauty breathes
Health giving life from the shining seas;
From all the earth we come to you
For sport, for play — our lives renew,
For Florida's fame stands beyond dispute
Her beauties, her joys — of high repute
We Salute : " O Florida ".

येथील सृष्टिदेवतेस मी नमस्कार करून डेटोनाबीच स्टेशनवर उतरलों. न स्टेशन, न प्लॅटफार्म; अशा ठिकाणीं आगगाडी उभी राहिली. मला वाटलें, असेल कांहीं तरी; परंतु माझ्या डब्यांतील रेल्वेकंडक्टरनें मला सांगितलें— " डेटोनाबीच स्टेशन हेच आहे, आपण येथें उतरा." मी खालीं उतरलों. रेल्वेचा डबल रुळाचा रस्ता सोडून दिला तर चोहोंकडे उंच उंच अशीं ताडांचीं व नारळांचीं झाडें. दाट अशा जंगलांत मला सोडून गाडी दोन

मिनिटांत निघून गेली. माझ्याबरोबर उतर लेले आठदहा प्रवासी आप-आपली बॅग घेऊन निरनिराळ्या पाऊलवाटेनें निघून गेले. मी कोणती वाट घेऊं हें मला कळेना. निर्जनता मला खाण्यास येऊं लागली. विमनस्क मनानें बॅग घेऊन मी वाट दिसेल तिकडे पाऊल टाकूं लागलों. इतक्यांत समोरून एक गृहस्थ आले व मला म्हणाले—"मी आपल्याला मदत करूं शकतों का ?" अशा वेळेस मदत कोणींहि केली तरी ती मला पाहिजेच होती. मी त्याला म्हणालों—"मला वाय्. एम्. सी. ए. चा रस्ता दाखवा." त्या गृहस्थानें माझ्या हातांतून माझी बॅग घेतली व जवळ उभ्या असलेल्या आपल्या मोटारींत ठेवली. थोड्याच वेळांत आम्ही दोघे या संस्थेंत येऊन पोहोंचलों. या संस्थेंत फक्त खेळण्याची व्यवस्था होती, राहण्याची नव्हती, म्हणून आम्ही प्रौढांध व्यवसायकेंद्रांत गेलों. मिस्टर व मिसेस् हॉल माझ्या स्वागतासाठीं पुढें आले. हे या व्यवसाय-केंद्रींच मुख्य व्यवस्थापक आहेत. मी ही संस्था पाहण्यास येणार म्हणून त्यांना वॉशिंग्टन सरकारकडून तारहि आली होती.

मिस्टर हॉलनें—" हा हंगाम फिशिंगचा ( मासे पकडण्याचा ) आहे

मिस्टर व मिसेस हॉल. डावीकडून पहिले मानसशास्त्राचे प्रोफेसर

( '-You will enjoy fishing-' ) गोड्या व खाऱ्या पाण्यांत सांपड-

णाऱ्या विविध माशांचें छान पक्वान्न आमची बायको तुमच्यासाठीं करील." असें म्हणून हंसतमुखानें त्यांनीं माझ्याशीं हस्तांदोलन केलें व त्यांच्या पाठोपाठ त्यांच्या पत्नीनेंहि तेंच केलें.

मासे पकडणारा किंवा खाणारा मी नाहीं असें प्रथमदर्शनीं मी कशाला म्हणूं ?

मिस्टर हॉलबरोबर त्यांच्या मोटारींतून मी रोज पहाटे फिरण्यास जात असे. शंभर मैल मोटारीची सहल रोजची असे. अॅटलांटिक महासागराच्या पाण्याशेजारीं असलेल्या बारीक, मऊ, चमकणाऱ्या रेतीच्या मैदानांतून पाण्याच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें मोटारी भरधाव जातात. १००–१५० मोटारी ओळीनें एकाच वेळीं सहज जातील इतका रुंद हा किनारा आहे. हा किनारा चारपांचशें मैल लांबीचा आहे. या समुद्रकिनाऱ्याला समांतर अशी हॅलिफॅक्स नदी आहे. समुद्रकिनारा व नदीकांठ यामध्यें अर्धा मैल रुंदीचा जमिनीचा पट्टा दिसतो. कांठ व किनाऱ्याला लागून रुंद असे डांबरी रस्ते आहेत. या दोन रस्त्यांच्या चारी बाजूला एकाच आकाराच्या व उंचीच्या चार लांबच लांब ताडाच्या रांगा आहेत. याच रस्त्यावर सुंदर बगीचे व त्यांत प्रवाशांकरितां हॉटेल्स आहेत.

मिसेस् हॉल या माझ्या आवडीप्रमाणें स्वयंपाक करीत. माझ्या प्रकृतीला मासे मानवत नाहींत अशी थाप मारून मीं मासे खाणें टाळलें. परंतु मासे पकडण्याकरितां मिस्टर व मिसेस् हॉल व कांहीं प्रौढ अंधांबरोबर मला जावें लागे. पांचपंचवीस मैल समुद्र किंवा नदीच्या कांठाकांठानें गेल्यावर बस रस्त्यावर सोडून आम्ही तिघे तिघे एका लहान होडग्यांतून समुद्रांत अथवा नदींत मासे पकडण्यास जात असूं. आंधळीं माणसें मासे कसें पकडतात याचें सूक्ष्म निरीक्षण मात्र मला करावयास मिळालें. मला गळाची एक निमुळती काठी दिली गेली. त्यांची मासे पकडण्याची रीत म्हणजे गळाच्या अणकुचीदार कांटा एका जिवंत झिंगराच्या पोटांत खुपसावयाचा व नंतर गळ दूर पाण्यांत फेकून द्यावयाचा. असा क्रम सकाळपासून संध्याकाळपर्यंत चालत असे. मोठा मासा झिंगरु खाण्यास वर

येई, त्यावेळेस हा गळाचा कांटा त्याच्या टाळूला अडकून बसे. हाताला हिसका बसतांच मला कळून येई कीं, मासा अडकला आहे. माझ्या घराण्यांत कोणीहि न केलेलें हें मासे पकडण्याचें काम मला येथें करावें




डेटोनाबीच येथील प्रौढ अंध मासे पकडण्यास जात आहेत.

लागलें. एक फूट व दीड फूट लांबीचे मासे ज्या वेळेस मी पकडत असे, तेव्हां माझे साथी आनंदानें आरोळ्या ठोकीत व माझें अभिनंदन करीत. परंतु माशांचें तडफडणें पाहून माझा जीव कळवळून येई.

मिस्टर हॉलचा जॅक येलविंगटन नांवाचा नोकर आनंदी व विनोदी तरुण होता. त्यांच्याच अंधसंस्थेंत तो वेतकाम व चर्मकाम शिकवीत असे. याची व माझी चांगलीच मैत्री झाली. याच्या विनोदी स्वभावामुळें मला हंसतां हंसतां पुरेवाट होई. आपल्या कामांतहि तो तरबेज होता. दहा दहा तास उभे राहून तो काम करी, पण थकवा कसा तो त्याला माहीत नव्हता. त्यानें आपल्या हृदयांत वागवीत असलेल्या एका सुंदर तरुणीचें चित्र मला दाखविलें व तो म्हणाला—“ ही कोण आहे ती ओळखा पाहूं ? ” मी घोंटाळ्यांत पडलों. तो लगेच म्हणाला—“ तुमचे तरुणी नेत्र नष्ट झाले आहेत. अहो, ही मिसेस् हॉलची मुलगी. त्यांच्याच

प्रमाणें ही आहे ना? ती आतां जहाजावर ऑफिसर आहे. ती सध्यां ऑस्ट्रेलियाकडे गेली आहे. मिस्टर व मिसेस् हॉलनें आमच्या लग्नाला संमति दिली आहे," असें म्हणून तो माझे हात धरून नाचूं लागला.



मिस्टर येलविंगटनबरोबर.

एकदां मिस्टर जॅक येलविंगटन माझ्या खोलींत रात्रीं आठ वाजतां आला आणि म्हणाला—" मिस्टर राव, आज रात्रीं आपण नाचण्यास जाऊं या. तेथें सुंदर मुली आहेत व पिण्यास मदिरा पण आहे."

मी म्हणालों—" मला नाचण्याची संवय नाहीं व मदिरा पण मी पीत नाहीं."

परंतु त्याच्या आग्रहास्तव मला त्याच्याबरोबर जाणें भाग पडलें. मंद प्रकाशित एका हॉलमध्यें बरेच स्त्रीपुरुष जमले होते. डेटोनाबीच-मधील स्त्रियांचा पोषाख म्हणजे छातीवर रेशमी कापडाची किंवा प्लॅस्टिकची पट्टी पाठीमागें रबरी फितीनें बसविलेली असते, व कंबरेखालीं अर्ध्या मांडीपर्यंत निरनिराळया रंगाच्या पट्ट्यांचे नीकर्स्. पुरुषांचे पोषाख शुभ्र शर्ट, टाय व पॅंट. या हॉलमध्यें बरीचशी जागा मोकळी असून या जागेपाठीमागें वाद्यें वाजविणारांचा ताफा होता. या मोकळ्या जागे-भोंवतीं खुर्च्या व टेबलें ठेवलीं होतीं. येथें बरेच स्त्रीपुरुष गप्पा ठोकींत

व मदिरा प्राशन करीत बसले होते. कोणीहि स्त्रीपुरुष मध्यभागीं येऊन वाद्याच्या तालावर नाचत असत. माझ्या टेबलाभोंवतीं आठ दहा स्त्रीपुरुष बसले होते. येलविंगटननें माझी ओळख त्यांच्याशीं करून दिली. एका ट्रेमध्यें मदिरेचे पेले घेऊन येणारी तरुणी कमी आकर्षक नव्हती. आपल्या गोऱ्या अंगावर दोन काळ्या वस्त्रांच्या पट्ट्या घट्ट रीतीनें तिनें गुंडाळल्या होत्या,—एक छातीवर व दुसरी कंबरेभोंवतीं. मदिरेच्या ऐवजीं मीं मुसंबीचा रस मागविला. दोघीतिघींनीं माझ्याबरोबर नाचण्याची इच्छा प्रदर्शित केली; परंतु त्यांची क्षमा मागून मीं माझी सुटका करून घेतली. एक गृहस्थ एका बाईबरोबर नाचून आले व माझ्या शेजारीं बसले. ते त्या बाईला म्हणाले—"I don't understand why I am so much interested in you." लगेच ती म्हणाली—"I am sorry, I am married." त्या गृहस्थानें— "Excuse me' असें म्हणून ही सांकेतिक भाषा संपविली.

हा कार्यक्रम रात्रीं दोन वाजेपर्यंत चालला. दुसऱ्या दिवशीं रविवार असल्यामुळें कोणालाच घाई नव्हती. वेळोवेळीं मदिरापान करणारे हे लोक मला झिंगलेले किंवा बरळणारे दिसले नाहींत.

मिस्टर व मिसेस् हॉलचे अतिथिसत्कार मी कधींच विसरणार नाहीं. मला फळांची आवड फार आहे असें समजल्यावर ते जेवणाच्या वेळीं बिनबियांचीं मोठीं द्राक्षें, अननस, सफरचंद, स्ट्रॉबेरीज वगैरे ताजीं फळें टेबलावर ठेवीत असत. त्यांच्या बरोबर नैसर्गिक फळाफुलांनीं बहरलेल्या वनांतून जात असतां मी प्रसन्न मनानें वनदेवतेस पुनः पुनः नमस्कार करी.

ध्यान–धारणेला योग्य अशा रम्य व एकांत जागीं मला खालील कवितेच्या ओळीं आठवल्या व त्याची पुरेपूर सत्यता पटली.

"The kiss of the sun for Pardon,
The song of the birds for mirth
You are nearer God's heart in a garden
Than anywhere else on Earth".

---

# प्रकरण ३९ वें

फ्लॉरिडा राज्यांतील सेंट ऑगस्टिन हे अमेरिकेंतील सर्वांत जुनें शहर आहे. १५१३ सालीं स्पेनच्या वसाहतवाल्यानें ही नगरी वसविली आहे. गांवांत जाण्यास दगडी वेशी आहेत. रस्ते अत्यंत अरुंद व घरें एक अगर दुमजली आहेत. दिसण्यासहि हें शहर जुनें आहे. येथें १५१३ मध्यें बांधलेलें पहिलें घर दाखविलें जातें. त्या घरांतील फार्निचराहि त्या काळचेंच आहे. या घरावर सध्यां चार प्रकारचे झेंडे फडकत आहेत. एक स्पेन सरकारचा, दुसरा इंग्रजांचा, तिसरा वसाहत करणाऱ्या संघराष्ट्राचा व चौथा अमेरिकन सरकारचा. पहिलीं तिन्ही सरकारें काल-प्रवाहांत नष्ट झालीं; परंतु त्या तिन्ही सरकारचीं चिन्हें मात्र झेंड्याच्या रूपानें अजूनहि कायम आहेत.

येथें स्पॅनिश लोकांनीं बांधलेला दगडी भुईकोट किल्ला आहे. या किल्ल्याचें नांव कॅस्टिलो डी सॅन् मार्कास् हें आहे. हा १६७२ सालीं बांधला गेला. या किल्ल्याभोंवतीं चाळीस फूट रुंदीचा खंदक आहे. आंत जाण्याकरितां तेथें काढतां व घालतां येण्यासारखा पूल आहे. याचा दगडी तट १६ फूट जाडीचा आहे. या किल्ल्यानें सेंट ऑगस्टिन शहराचें संरक्षण तीन शतकें केलें आहे. आपल्याकडील किल्ल्यांत नेहमीं आढळून येणाऱ्या जागा उदा० :—अंधारकोठडीचे तुरुंग, शत्रूला पकडून फांशी देण्याची जागा, संपत्ति–भांडार, निखाऱ्यांचे खंदक वगैरे जागा येथेंहि दाखविण्यांत येतात. लष्करी दृष्टीनें सध्यां ह्याचा कांहींच उपयोग नाहीं. आफ्रिकेंतून निग्रो लोकांना आणून गुलाम म्हणून विकण्याकरितां येथें मोठा बाजार भरत असे. एखाद्या गुलामानें अपराध केल्यास त्याला शिक्षा म्हणून त्याच्या उघड्या पाठीवर दहा ते पन्नास कोरडे मारीत असत. या जागाहि मला दाखविण्यांत आल्या. २१ एप्रिल १८३८ सालीं सॅली नांवाच्या निग्रो स्त्रीची विक्री लिलांवानें ७०१ डॉलर किंमतीनें झाली. यानंतर लिलांव कायद्यानें बंद झाला.

येथील एका प्राणिसंग्रहालयाच्या बागेंत एके ठिकाणीं हजारों जिवंत सुसरी होत्या. जगांतील कोणत्याहि प्राणिसंग्रहालयांत इतक्या सुसरी नाहींत असें सांगतात. या शहरापासून ॲटलांटिक महासागरांत एक मैलपर्यंत एक लाकडी पूल आहे. एक मैलानंतर हा पूल संपतो. या शेवटच्या टोंकाला येऊन महासागराचा प्रचंड व भयाण अवतार पाहून भीति वाटते. हा लाकडी पूलहि लाटांच्या धक्क्यानें दोही बाजूनें एक एक फूट हालत असतो. या भयानक दृश्याचे अनुभव घेण्याकारितां येथें पुष्कळ स्त्रीपुरुषांची गर्दी असते.

येथील सरकारी अंधमूक विद्यालयाचे प्रमुख डॉ. सीटलस् यांच्या



डॉ. सीटलस्

घरीं मी आठ दिवस होतों. हे गृहस्थ अत्यंत देवभक्त. जेवतांना, रोज शाळा भरण्यापूर्वी व सुटण्यापूर्वी ते स्वतः प्रार्थना म्हणत असत. यांच्या प्रार्थनेंत हे नेहमीं म्हणत--"हे देवा, आमच्या अमेरिकेंत कम्युनिस्टांना थारा देऊं नकोस."

यांच्या शाळेंत एक अंध प्रोफेसर आहेत. अकस्मात् मी त्यांच्या वर्गांत गेलों, तेव्हां ते संस्कृत वाङ्मयाचा इतिहास अंध विद्यार्थ्यांना

शिकवीत होते. मी संस्कृत भाषेच्या देशांतून आलेला ऐकून त्या अंध प्रोफेसरांना फार आनंद झाला. संस्कृत गद्य व पद्य लेखकांची व त्यांच्या ग्रंथ-संपत्तीची जी माहिती त्यांनीं मला सांगितली ती ऐकून मला माझ्या अज्ञानाची कींव आली. तरी पण लहानपणीं पूजेचे मंत्र शिकल्यामुळें व नंतर इंटरपर्यंत संस्कृत हा विषय परीक्षेस असल्यामुळें प्रोफेसर-साहेबांनीं इच्छा दर्शविल्यामुळें वेदमंत्रपुरुषसूक्ताच्या ऋचा, भागवता-मधील गोपीगीत, गीतेंतील पंधरावा अध्याय व भर्तृहरीचे कांहीं श्लोक मीं त्यांना म्हणून दाखविलें. शकुंतलेच्या स्त्रीहृदयाची कल्पना जी कविश्रेष्ठ कालिदासानें वर्णन केली आह, त्यावर या अंध प्रोफेसरांनीं वक्तृत्व-पूर्ण व प्रभावी भाषण मला ऐकविलें.

या शाळेंतील आणखी एका वृद्ध अंधशिक्षिकेनें माझें मन आकर्षिलें. हिचें नांव डेझी वुईलसन. परिचय झाल्यानंतर ती मला म्हणाली— " तुमच्या देशांत मानवप्राण्याच्या पूर्वजन्माचें शास्त्र पूर्णतेला पोहोंचलें आहे. तरी आपण असे कांहीं ग्रंथ वाचले आहेत का ? "

मिस् डेझी वुइल्सन. पूर्वजन्मस्मरणारी.

मी म्हणालों—" असे ग्रंथ माझ्या वाचण्यांत नाहींत. परंतु प्रत्येक हिंदु मनुष्याचा पूर्वजन्मसिद्धांतावर अढळ विश्वास आहे. आपल्याला पूर्वजन्माची कल्पना कोठून आली ? "

डेझी वुईल्सन्—" मी जरी आज सत्तर वर्षांची आहें तरी माझ्या वयाच्या बाराव्या वर्षापर्यंत मला माझ्या गेल्या जन्माची आठवण होत असे. पुर्नजन्मांतील माझे आईबाप, बहीणभाऊ, आप्तइष्ट, इतकेंच काय माझें घर व घरांतील सामानसुद्धां मला आठवत असे. वयाच्या बारा- वर्षांनंतर ही आठवण माझ्या स्मृतींतून हळूहळू नष्ट झाली. मला लहान- पणीं पूर्वजन्माची आठवण होत असे, इतकेंच आतां शिल्लक राहिलें आहे. मला पुढचा जन्म चांगला यावा म्हणून मीं काय करावें ? "

मी म्हणालो —" सत्कर्म केल्यास पुढचा जन्म चांगला येतो असें आमचें शास्त्र सांगतें. ' शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ' असें आमच्या भगवंतांनीं गीतेंत सांगितलें आहे. "

या मुलाखतीनंतर डेझी वुईलसननें ऑर्गनवर आपलें आवडतें स्तुति- गीत मला म्हणून दाखविलें.

---

## प्रकरण ३७

अमेरिकेंतील माझ्या निरीक्षणाचा व अभ्यासाचा कार्यक्रम संपण्या- पूर्वीं १५ दिवस आधीं माझ्या अधिकाऱ्यानें मला वॉशिंग्टनला व न्यूयॉर्कला बोलावून घेतलें. वॉशिंग्टन येथें सात दिवस व न्यूयॉर्क येथें आठ दिवस मी होतों.

सहा महिन्यांत मीं जो अभ्यास केला त्याचा अहवाल अमेरिकन सरकार व संयुक्त राष्ट्रसंघाला या पंधरा दिवसांच्या मुदतींत मला लिहून द्यावयाचा होता. शेंकडों तज्ज्ञ लोकांशीं माझ्या मुलाखती झाल्या, कित्येक अंध व मूक शाळा मीं पाहिल्या, प्रौढ अंध व मूक हे शेतांत,

कारखान्यांत, कचेरींत, न्यायालयांत आणि विद्यापीठांत उच्च शिक्षणानंतर कसें काम करतात हें मीं पाहिलें. शेंकडों पुस्तकें, मासिकपत्रें व अहवाल या विषयावर माझ्याजवळ जमले होते. माझीं टांचणें हजारोंवर आलीं होतीं. या सर्व माहितीची जमवाजमव करून मीं अहवालाची रूपरेषा तयार केली. ही रूपरेषा अधिकाऱ्यांना पसंत पडल्यानंतर सुमारें २०० पानांचा हस्तलिखित अहवाल तयार करण्यास मला आठ दिवस सतत काम करावें लागलें. माझ्यासारख्या निरीक्षकानें तयार केलेल्या इतर राष्ट्रांतील निरीक्षकांच्या अहवालाच्या प्रती मीं पाहिल्या होत्या. त्या लोकांच्या अहवालापेक्षां कांहीं तरी नाविन्य माझ्या अहवालांत पाहिजे ही माझी महत्त्वाकांक्षा होती. माझी हस्तालिखित प्रत कमिटीला पसंत पडल्यावर मला माझ्या विषयांत नैपुण्य मिळाल्याचीं दोन सर्टिफिकेटस् देण्यांत आलीं, एक अमेरिकन सरकारकडून व दुसरें राष्ट्रसंघाकडून. अमेरिकन सरकारी अधिकाऱ्यानें " Your report is most interesting of all the reports ever received "—असें प्रशस्तिपत्रहि मला पाठविलें.

माझ्या हस्तालिखित अहवालाच्या आठ नकला टाईप करून मला राष्ट्रसंघाला सादर करावयाच्या होत्या. टाईपरायटर, कागद वगैरे देऊन मला एक स्वतंत्र खोली देण्यांत आली. हें काम पार पाडण्यासाठीं तीन दिवसांची मुदत मला देण्यांत आली. टायपिंगचा माझा वेग गोगलगाईप्रमाणें असल्यामुळें न्यूयॉर्कमधील एका प्रसिद्ध न्यूयॉर्कर हॉटेलमधील एका स्त्री स्टेनोटायपिस्टची मीं मदत घेतली. तिनें ठीक पांच वाजतां संध्याकाळीं टायपिंगला सुरुवात केली आणि रात्रीं साडेदहा वाजतां सर्व काम संपविलें. या कामाच्या तासांत तिला विश्रांतीची मुळींच गरज भासली नाहीं. शेवटच्या पानाची शेवटची ओळ संपल्या-बरोबर तिनें ताबडतोब आपलें बिल मला दिलें. तिनें चटकन् कसा हिशेब केला हेंही मला सांगितलें.

रिपोर्ट टाईप होऊन तयार झाला म्हणून मला पुष्कळच हलकें वाटलें. मी हिंदुस्थानास जाण्यास उत्सुक झालों होतों. हें काम संपल्यामुळें मला

पुढची वाट मोकळी झाली. रिपोर्टचीं पानें जुळवून व्यवस्थित करण्या-करितां मी रात्रीं आठ वाजतां जों बसलों ते पहाटे पांच वाजतां काम संपवून स्नानाला गेलों, नंतर थोडा फराळ करून पुनः कामाला लागलों.

मीं माझ्या रिपोर्टची रूपरेषा अशी आंखली होती — पहिलीं दहा पानें मीं ज्या संस्था पाहिल्या त्यांचीं नांवें, त्यांचे चालक व पत्ता आणि भेट देण्याची तारीख यांत गेलीं; नंतर माझ्या विषयाला उपयुक्त वाटणाऱ्या ग्रंथांची व मासिक–पत्रांची यादी मीं दिली. हीं मासिक-पत्रें कोठें मिळतात, त्यांच्या संपादकाचें नांव व त्यांच्या किंमतीहि त्यांत मीं लिहिल्या. अहवालाच्या मुख्य भागांत अमेरिकेंत माझा येण्याचा उद्देश, तो कितपत साध्य झाला हें उदाहरणांसहित दाखविलें. निरनिराळ्या संस्थेंत मीं काय निरीक्षण केलें व तज्ज्ञांच्या मुलाखतीपासून मला काय फायदा झाला याचा सांगोपांग विचार मीं त्यांत केला. शेवटीं हिंदुस्थान सरकारनें व समाजसुधारकानें आपली संस्कृति व आर्थिक परिस्थिति लक्षांत घेऊन तेथील लाखों परावलंबी पंगु लोकांना सन्माननीय नागरिक बनविण्याकरितां काय करावयाला पाहिजे हें दाखविलें आहे. या अहवालांतच शेवटीं मीं माझ्या कॅमेरानें घेतलेले कांहीं फोटो चिकटविले आहेत. यांत अंध व मूक शेतकरी, कामकरी, गवळी, कोळी, शिंपी आपापलें काम: करीत असतांना घेतलेले फोटो आहेत.

माझ्या वरिष्ठ अधिकाऱ्यानें मला निरोप देण्याचा समारंभहि न्यूयॉर्क व वॉशिंग्टन येथील आपापल्या कचेरींत घडवून आणिला. व्यक्तिश: प्रशंसापत्रकेंहि मला दिलीं गेलीं.

कॅनडांतील कित्येक अंध मूक संस्थांना मीं भेट द्यावी म्हणून मला निमंत्रणें आलीं होतीं. परंतु कांहीं कामानिमित्त मला तीं नाकारावीं लागलीं.

हिंदुस्थानला परत जातांना काय अडचणी येतील याची मला प्रथमतः कांहींच कल्पना नव्हती. हिंदुस्थानांतून येथें येतांना मला अनेक अडचणी आल्या. परंतु राष्ट्रसंघाच्या सामाजिक शाखेच्या

चिटणिसानें मला फ़ोननें कळविलें, "सर्व कांहीं ठीक आहे, आपण नेमलेल्या तारखेस अमेरिकन एअर लाईन्सनें लंडनला जावें. तेथें एअर इंडिया इंटरनॅशनल तुम्हांला हिंदुस्थानला घेऊन जाण्याची सोय करील."

माझ्या काटकसरीच्या राहणीमुळें मी कांहीं डॉलर्स शिल्लक टाकूं शकलों. त्यांचा कांहीं नवीन वस्तु घेण्यासाठीं उपयोग केला. पुस्तकाचें व कपड्यांचें वजन फार झाल्यामुळें मीं तें पोस्टानें पाठवून दिलें. दोन हलक्या बॅगा मात्र मीं माझ्याजवळ ठेवल्या होत्या.

संध्याकाळीं चार वाजतां न्यूयॉर्क विमानतळावर मी आलों. या शहरावर आमच्या विमानानें दोन तीन मंडळें घेतलीं व तें उत्तरेच्या बाजूनें निघालें. रात्रीं दहा वाजतां न्यूफाऊंडलंडला विमान आलें. विमानांत कांहीं बिघाड झाल्याचें जाहीर केल्यामुळें आम्हांला येथें एक वाजेपर्यंत बसणें भाग पडलें. त्यामुळें दुसऱ्या दिवशीं सकाळीं ९ वाजतां आम्ही लंडनला पोहोंचलों. मला हिंदुस्थानला जावयाचें आहे याची तार येथें अगोदरच आली होती. एक हिंदी गृहस्थ माझ्या शोधांतच होते. ते माझ्याजवळ येऊन म्हणाले—"आज विमान निघणार नाहीं, आपल्याला येथें एक दिवस राहिलें पाहिजे. आपली राहण्याची सोय येथील केनसिंगटन हॉटेलमध्यें आम्हीं केली आहे. नाइलाजास्तव मला येथें राहणें भाग पडलें. सर्व दिवस व रात्र भटकण्यांत घालविली मीं. न्यूयॉर्क पाहिल्यामुळें येथील माणसें व घरें मला अगदींच कमी प्रतीचीं वाटलीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आमचें एअर इंडिया इंटरनॅशनलचें विमान येथून निघालें. फक्त जिनिव्हा व कायरोला पेट्रोल घेण्याकरितां विमान उतरलें होतें. कायरोहून रात्रीं नऊ वाजतां विमान जें थेट निघालें तें दुसऱ्या दिवशीं दुपारीं ठीक एक वाजतां मुंबईच्या सांताक्रूझ विमानतळावर उतरलें. सहा महिन्यांपूर्वीं येथून निघतांना 'यत्र योगेश्वर: कृष्णो' मी म्हणालों होतों, तर आतां —'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी'—असें म्हणून मातृभूमीला वंदन करून विमानाच्या पायरीवरून पहिलें पाऊल मीं मातृभूमीवर टाकलें.

---

# उपसंहार

आधुनिक सुखसोयींनीं समृद्ध अशा श्रीमंत अमेरिकन राष्ट्राला पाहिल्यावर कुणाचे डोळे दिपणार नाहींत ? आपण हिंदी लोक पुष्कळ वेळां त्यांच्या आरामाच्या गोष्टी उचलतों, परंतु या आरामाच्या पाठीमागें त्यांच्या कष्टाळू जीवनाची कल्पना आपण करीत नाहीं. तेथील ऑफिसची वेळ नऊ ते पांच असते. व्यवस्थित केंस विंचरून व स्वच्छ कपडे घालून स्त्री व पुरुष कारकून, व हुद्देदारवर्ग आपापलें काम टंगळ-मंगळ न करितां करतात. शेतकरी व कामगारांना कामाचा उरक जास्त आणि त्यांचा उत्साह दिवसाच्या अंतापर्यंत कायम टिकणारा दिसून येतो. आपण 'कर्मण्येवाधिकारस्ते' म्हणतों, परंतु कर्तव्य करण्याच्या अगोदरच फलाची अपेक्षा करतों.

अमेरिकन स्त्रिया जास्त स्वातंत्र्यप्रिय असल्यामुळें तिकडे अनीति जास्त आहे, असें आपण समजतों. स्त्रियांचे हात धरून किंवा खांद्यावर हात ठेवून कित्येक पुरुष चालतांना दिसतात. आपल्या रूढीप्रमाणें या गोष्टी अनीतीच्या समजल्या जातात. नीतीचीं बंधनेंहि तिकडे पाळलीं जातात. कामवासनेला बळी पडून यथेच्छ धुडगूस घालणाऱ्या स्त्री-पुरुषांना तेथील समाजांत मानाचें स्थान नाहीं.

डॉलरच्या देशांत देवाला स्थान नाहीं असें आपल्याकडे म्हणतात. परंतु दर रविवारीं प्रार्थना–मंदिरांत गर्दी दिसून येते. दररोज माळ घेऊन चर्चमध्यें जप करीत बसलेलेहि मीं कित्येक स्त्रीपुरुष पाहिले आहेत. परदेशांतील माणसाबरोबर यांची वागणूक प्रेमाची व खेळीमेळीची असते. त्यांच्या टेबलावर बसून कांटे चमचे न वापरतां तुम्ही आपल्या बोटांनीं जरी जेवला (ही गोष्ट त्यांच्या मनाविरुद्ध जरी असली), तरी ते तुम्हांला दुखविणार नाहींत; उलट म्हणतील, "किती तुमचीं लवचीक बोटें, how wonderful ?"

दोष कोणामध्यें नाहींत ? जगांतील प्रत्येक राष्ट्रांत कांहींना कांहीं व्यंगें आढळून येतातच, तीच गोष्ट अमेरिकेची. अवाढव्य प्रमाणांत चालत असलेली प्राणिहत्या खाटिकखान्यांत पाहतांना आपल्याला शिसारी येते. समाईक कुटुंबपद्धतीच्या अभावामुळें पारस्परिक संबंध हे कृत्रिम झाले आहेत. पतिपत्नीचें प्रेम जास्त मित्रत्वाचें, आत्मीयता येथें कमी आढळून येत असल्यामुळें हें नातें क्षुल्लक कारणावरून केव्हां तुटेल याचा नेम नाहीं. एखाद्या घरांतील घरधनीण सकाळीं अंथरुणांतून उठल्याबरोबर ब्रेकफास्टची तयारी करते. आपल्या घरापुढें सडा-संमार्जन, रांगोळी वगैरे घालून अंग धुवून हिंदु बाईचें स्वयंपाक करणें कोणीकडे व अंथरुणांतून उठून स्वयंपाकघराकडे धांव घेणें कोणीकडे ! लोकभ्रम तिकडेहि आहेतच. तेरा तारीख शुक्रवारीं येणें, पलंगावर डावी-कडून चढणें व उतरणें, काळें मांजर आडवें जाणें, दोन खांबांमधून जाणें, शिडीखालून चालणें, वगैरे अत्यंत अशुभ मानिलें जातें. अमेरिकन लोकांच्या दोषांकडे न पाहतां त्यांच्या सद्गुणांकडे दृष्टि देऊन ते अंगीं आणण्याचा आपण प्रयत्न करावयास पाहिजे.

---